अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ७५

# अभंग गुलाब

डॉ. सुनील होले
डॉ. कविता होले

प्रधानसंपादक
आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु

संपादक
आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग



कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)
२०२०

शीर्षक – अभंग गुलाब

लेखक – डॉ. सुनील होले व डॉ. कविता होले

प्रधानसंपादक – आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक

संपादक – आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,
क.का.सं.वि., रामटेक

अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन – प्रो. गौतम पटेल, अध्यक्ष
प्रो. सरोजा भाटे, सचिव
प्रो. ग. उ. थिटे, उपाध्यक्ष

संपादक मंडळ – डॉ. दिनकर मराठे, क.का.सं.वि., रामटेक
डॉ. वीणा गानु, नागपुर.

प्रकाशन वर्ष – २०२०

आवृत्ती – प्रथम

मूल्य – रू. ३४०/–

आय.एस.बी.एन. – ९७८–९३–८५७९०–२९–२

मुखपृष्ठ – श्री. उमेश पाटील

मुद्रक – अवधूत ग्रॉफिक्स अ‍ॅण्ड प्रिन्टींग, नागपूर

प्रकाशक – कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक
प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.



## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past

## Reception Committee

Prof. Srinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

### Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)



# आमुख

प्रा. कविता होले आणि डॉ. सुनील होले यांनी प्रज्ञाचक्षू व समन्वयमहर्षी श्री. गुलाबराव महाराजांच्या 'अभंग' साहित्यावर मौलिक काम करून रचलेला ग्रन्थ म्हणजे हा 'अभंग-गुलाब' होय. याची प्रस्तावना लिहिण्यास मला प्रोत्साहित करून महाराजांप्रती माझ्या हृदयात असलेल्या भक्तिभावना, गुरुभावना व अत्यंत आदर इत्यादि व्यक्त करण्यास मला संधी दिली, त्याबद्दल मी लेखकांप्रती ऋणी आहे.

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज एक अलौकिक विभूती आहे असे म्हटले तर काही अतिशयोक्ती होणार नाही. एका मेधावी व्यक्तीने स्वत:च्या आयुष्यात काही चांगले ग्रंथ रचले तर समाज तिचे अभिनंदन करते. एखाद्या संस्थेने फार मोठे काम केले तर त्यापेक्षा अधिक कौतुक करते. श्री गुलाबराव महाराज व्यक्ती आहे. तरी एक मोठी संस्था आहे, ज्यांच्या प्रेरणेने येणाऱ्या अनेक वर्षांमध्ये भारतीय दर्शनात, धर्मविषयात व विज्ञानात उल्लेखनीय काम होणार आहे.

श्री गुलाबराव महाराज यांनी विदर्भातील माधान नावाच्या गावात जन्म घेऊन स्वत:च्या ३४ वर्षांच्या अल्प आयुष्यात सुमारे १३९ ग्रन्थांची रचना करून महाराष्ट्रातील भक्तिसंप्रदायाला ज्ञानेश्वराचार्यांच्या प्रमाणावर 'मधुराद्वैतसंप्रदाया' च्या मोठ्या शिखरावर स्थापित केले. ते अल्प होते म्हणून 'प्रज्ञाचक्षू' या नावाने प्रसिद्ध झाले. अलौकिक विभूती असलेल्या महाराजांची ग्रंथसंपदा बरीच मोठी आहे. एकूण ग्रंथसंख्या १३३ पत्रे व समीक्षा ११९, अभंग २५००, पदे २५००, गीते १२५० श्लोकादी, कविता १०००, ओव्या २३०० असून अंदाजे ६००० पृष्ठे आहेत. ही सर्व रचना संस्कृत, मराठी, हिन्दी, व्रजभाषा व वऱ्हाडी इ. भाषांतून झालेली आहे. अशा या वाङ्मय क्षीरसमुद्रातून निघालेले अमृत म्हणजे 'अभंग' होय. ह्या अभंगाच्या माध्यमातून महाराजांनी अनेक विषयांचे रहस्य आणि तात्त्विक ज्ञान उलगडून दाखविले आहे.

and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success. My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek
10th January 2020

Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU



## Kavikulaguru Kalidas Sanskrit University
## All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

प्रा. कविता होले आणि डॉ. सुनील होले यांनी श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगावर संशोधन करून योग्यपद्धतीने विषयांची मांडणी केली आहे. अभंगांमध्ये निक्षिप्त असलेले प्रामाणिक व पारम्पारिक तत्त्वज्ञान समजण्यास हा ग्रंथ अत्यंत उपयोगी राहील, यात काही शंका नाही. अशाप्रकारे संत श्री गुलाबराव महाराजांच्या साहित्यावर आणि तत्त्वज्ञानावर संशोधन झाल्याने समाजाला योग्य दिशा मिळत राहील आणि तत्त्वज्ञानाच्या जीवनात परमार्थाकडे वाटचाल करतांना आलंबन प्राप्त होईल. लेखकांचे अभिनंदन करतो आणि मन:पूर्वक धन्यवाद ही व्यक्त करतो.

**प्रा. डॉ. मधुसूदन पेन्ना**
अधिष्ठाता,
भारतीय धर्म, तत्त्वज्ञान तथा संस्कृती संकाय,
क.का.सं.वि., रामटेक





## ऋणनिर्देश

कोणत्याही कार्याला अनेकांचे हातभार लागल्याशिवाय मूर्त स्वरूप देता येत नाही. या पुस्तकाला मूर्त स्वरूप देण्यासाठी अनेकांचे अमूल्य सहकार्य लाभले. या कार्यात वेळोवेळी मार्गदर्शन करणारे व प्रोत्साहन देणारे तीर्थरूप वडील श्री. भाऊरावजी होले यांच्या ऋणातच आम्ही राहू इच्छितो. तीर्थरूप आईनेही आम्हाला सतत या कार्यासाठी क्रियाशील ठेवले. तिचे ऋण शब्दातीत आहे, म्हणून शब्दांनी तिचे ऋण व्यक्त करून आम्ही आशीर्वाद मागतो.

आम्हाला वेळोवेळी मदत करणारे व आम्हाला निरंतर प्रेरणा देणारे डॉ. प्रदीप विटाळकर आणि डॉ. भैय्यासाहेब घटाटे यांचेप्रती आम्ही कृतज्ञ आहोत. ग्रामीण विकास संस्थेचे उपाध्यक्ष ॲड. मा. श्री. बाबासाहेब सुनकर यांचे वेळोवेळी आम्हाला मार्गदर्शन लाभले. तसेच या संस्थेच्या सचिव मा. सौ. रंजना पवार यांच्याही मार्गदर्शनाचा लाभ आम्हाला वेळोवेळी झाला. त्यामुळे त्यांच्या प्रती आम्ही कृतज्ञता व्यक्त करतो.

अखिल भारतीय प्राच्यविद्या संमेलनाच्या १०० व्या वर्षी कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयातर्फे हे पुस्तक प्रकाशित होत आहे. विश्वविद्यालयातर्फे पुस्तक प्रकाशन करण्यास मंजुरी प्रदान केल्याबद्दल मा. कुलगुरू आचार्य श्री. श्रीनिवास वरखेडी यांचे शतश: धन्यवाद.

समुचित प्रस्तावना देऊन विश्वविद्यालयाच्या भारतीय धर्म, तत्त्वज्ञान तथा संस्कृती संकायाचे अधिष्ठाता प्रा. डॉ. मधुसूदन पेन्ना

यांनी माझा गौरव वाढविला त्यांच्या प्रती आम्ही ऋणभाव प्रकट करतो.

सतत निरपेक्ष कौतुकाचा ओघ असलेले आमचे कुटुंबीय व सहकारी व टंकमुद्रण कार्यात सहकार्य करणारे श्री. उमेश पाटील यांचेही खूप खूप धन्यवाद.

शेवटी प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे ज्यांनी ज्यांनी आम्हाला लेखनकार्यात मदत केली व ज्या ज्ञात शक्तीचे सामर्थ्य आम्हाला या प्रकाशन कार्यासाठी लाभले, त्या सर्वांचे हार्दिक आभार मानून आम्ही ऋणनिर्देशाला विराम देतो.

**डॉ. सुनील होले**
**डॉ. कविता होले**



# प्रास्ताविक

भारतीय तत्त्वचिंतनाचा प्रवाह वेदांपासून ते आजतागायत अक्षुण्णपणे वाहत आला आहे. ग्रंथरचनेची प्रदीर्घ परंपरा आणि साधनेचे पथप्रदर्शन करणारी गुरुपरंपरा यातून तत्त्वचिंतनातील सैद्धांतिक संकल्पना तसेच साधनेची गूढ रहस्ये स्पष्ट होत गेली आहेत. एकोणिसाव्या शतकाची समाप्ती आणि विसाव्या शतकाचा प्रारंभ हा युगसंधीचा काळ, भारतीय प्रबोधनाचा काळ आहे. राजकीयदृष्ट्या हा काळ पारतंत्र्याचा असला तरीही एकप्रकारे हा काळ उपकारकच म्हणावा लागतो. कारण याच काळात विविध क्षेत्रातील उत्तुंग व्यक्तिमत्त्वे निर्माण झाली आहेत. स्वामी विवेकानंद, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, शेगावचे गजानन महाराज, अक्कलकोटचे स्वामी समर्थ, शिर्डीचे साईबाबा, अशी अध्यात्मिक आणि राजकीय व्यक्तिमत्त्वे या काळात उदय पावली. याच युगसंधीच्या काळात प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांचा अवतार झाला (इ.स. १८८१ ते १९१५). कोणत्याही प्रकारची पांडित्याची पार्श्वभूमी नसलेल्या अथवा वर्णप्रतिष्ठा न लाभलेल्या शूद्र कुळात जन्माला येऊनही विलक्षण पांडित्य संपादन करणारी ही व्यक्ती! अल्पवयातच अंधत्व आले असूनही डोळसाला लाजवेल अशी ग्रंथरचना करणारे हे व्यक्तित्त्व! केवळ भारतीयच नव्हे तर पाश्चात्य विचारवंतांचाही मागोवा घेणारे हे तत्त्वचिंतक आणि त्यांची सर्व रचना ही प्रेमरसाने ओथंबलेल्या माधुर्याचा आस्वाद चाखविणारी अशीच आहे.

प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज हे असे एकमेव संत आहेत की ज्यांनी वैदिक षड्दर्शनावर भाष्य लिहिले आहे. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी मधुराद्वैताचा संप्रदाय प्रवर्तित केला आणि यातूनच शांकरवेदांत आणि भक्तिमार्गाचा समन्वय प्रस्थापित केला. विविध क्षेत्रात समन्वय प्रस्थापित

करण्याचा प्रयत्न करणाऱ्या महाराजांनी समन्वयाची सूत्रे खालीलप्रमाणे मांडली आहेत -

१. एकाधिकरणक - सर्व संप्रदायांचा आधार एक आहे.

२. भिन्नत्वे सति - मात्र वृत्ती भिन्न भिन्न आहे.

३. संप्रदायविच्छेदरहितत्वे सति च - सर्व संप्रदायांचा समन्वय केला तरी कोणत्याही संप्रदाय परंपरांचा विच्छेद होत नाही.

४. पूर्वानेकफलावष्टंभानन्तरम् - उलट, सर्व संप्रदायानुसार त्यांना अपेक्षित असलेली अनेक भिन्न भिन्न फले प्राप्त होऊन शेवटी एकच ईश्वरप्राप्तिरूप फल सर्वांना प्राप्त होते.

५. एकफलजनकत्वम् - हे लक्षात घेणे म्हणजे समन्वय करणे होय.

समन्वयाचे सूत्र भारतीय संस्कृतीसाठी अत्यंत महत्त्वाचे आहे. कारण विविध दर्शने, तत्त्वज्ञाने आणि उपासनेचे मार्ग असलेल्या बृहत्तर भारतात एकत्व साधले जाऊ शकते ते केवळ समन्वयाच्या आधारावरच आणि हा समन्वयाचा आधार वेदकालापासून चालत आलेला आहे. **एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति** हे वेदांचे सूत्र आहे. सत्य हे एकच आहे. ज्ञानीजन ते वेगवेगळ्या प्रकारे मांडत असतात.

समन्वयाच्या या सूत्रातूनच पूज्यपाद आद्य शंकराचार्यांनी अद्वैताचे तत्त्वज्ञान मांडले. भारताच्या चार दिशांना चार मठ प्रस्थापित करून सांस्कृतिक समन्वय प्रस्थापित करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. आज भारतीय तत्त्वज्ञान म्हटले की शांकरवेदांतच आठवतो. तथापि, पूज्यपाद आचार्यांच्या तत्त्व ज्ञानाविषयी विशेषतः त्यांच्या विवर्तवादाविषयी आणि मायावादाविषयी अनेक वादग्रस्त संकल्पना प्रचलित झाल्या आहेत. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर माऊलीने





आपल्या भावार्थ दीपिकेची रचना **भाष्यकाराते वाट पुसतु** केली असली तरी हे भाष्यकार कोण, याविषयी पंडितांनी वाद घातले आहेत. तसेच ज्ञानेश्वर माऊलींचा चिद्विलासवाद आणि पूज्यपाद आचार्यांचा मायावाद हे एक की वेगळे यावर देखील वाद झाले आहेत. गेल्या पिढीतील पंडित पांडुरंग शर्मा, बाळाचार्य खुपेरकरशास्त्री यांनी या वादाचे प्रतिनिधित्व केलेले दिसून येते. पूज्यपाद आचार्यांविषयीच्या गैरसमजुतींमुळेच लोकमान्यांना **गीतारहस्य** लिहावे लागले.

प्रज्ञाचक्षूंनी ज्यांचे शिष्यत्व पत्करले त्या ज्ञानेश्वर माऊलीनेही शैव मार्गाच्या **नाथ संकेतीचा दंशु** हा महाविष्णुच्या तोंडी गीतेच्या रूपात वदवून समन्वयच साधला आहे. प्रज्ञाचक्षुंनी ही परंपरा कायम ठेवीत विविध दर्शनांमध्ये समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. ज्ञान आणि भक्ती यांचे एकीकरण करण्याचा प्रयत्न केला. अनध्यस्त विवर्ताची संकल्पना वेदांतात आणून शांकर वेदांत सुलभ केला आणि ज्ञानोत्तर भक्ती शक्य आहे की नाही हा काथ्याकुटाचा प्रश्न कायमचा रद्दबातल केला. प्रज्ञाचक्षुंच्या अशा या समृद्ध वाङ्मयाचा अभ्यास करावा अशी प्रेरणा केवळ सद्गुरू कृपेनेच होऊ शकली आणि गुरूकृपायोगानेच हा ग्रंथ पूर्ण होऊ शकला. सद्गुरूच्या प्रेरणेने झालेली ही कृती प्रज्ञाचक्षुंच्या चरणी समर्पित करीत आहोत.

**संतांची उच्छिष्टे बोलतो उत्तरे ।**
**म्या पामरे काय जाणावे ।।**

**डॉ. सुनील होले**
**डॉ. कविता होले**

## अनुक्रमणिका

# गुलाबराव महाराजांचे विविध विषयपर अभंग

संत गुलाबराव महाराजांची अभंगवाणी, मधुराभक्तियोग, ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान, वेदांत, श्रीकृष्णप्रेम हा आशय, अंधत्व, लौकिक शिक्षणाचा अभाव, सनातनत्व हे व्यक्तिविशेष, युक्तिवादचातुर्य हा आविष्कार, विशेष व मौखिक उत्स्फूर्त निर्मिती या अंगभूत वैशिष्ट्यांनी अपूर्व अशी आहे.

त्यांनी वेगवेगळ्या विषयांवर लिहिलेले अभंग खालीलप्रमाणे आहेत-

**मंगलाचरणपर अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या मंगलाचरणाच्या अभंगात फक्त १० अभंगांचा समावेश आहे. मंगलाचरणाच्या अभंगांतील वंदनाचा क्रम खालीलप्रमाणे आहे.

१) पहिला अभंग श्री. गजाननाच्या वंदनाचा आहे.

२) दुसरा अभंग हरिस्मरणाच्या वंदनेचा आहे. हरिस्मरण हे सर्व विघ्नांना दूर करते असे यात म्हटले आहे.

३) तिसऱ्या अभंगात ऋषिमुनींना तसेच संतसज्जनांना आपले विश्रांतीस्थान वाटणाऱ्या ज्ञानेश्वर महाराजांना वंदन केले आहे.

४) चौथ्या अभंगात सद्गुरू चरणांचे वंदन करण्यात आले आहे.

५) पाचव्या अभंगात उमानाथ शिवशंकराचे वंदन करण्यात आले आहे.

६) सहाव्या अभंगात भगवान श्रीकृष्णाचे वंदन करण्यात आले आहे.

७) सातव्या अभंगात पांडुरंगाच्या सगुण सावळ्या रूपाचे वंदन करण्यात आले आहे.

८) आठव्या अभंगात ज्ञानेश्वर चरणाचे वंदन करण्यात आले आहे.

९) नवव्या अभंगात मंगलाचरणरूप वंदन करीत असताना एकाग्रचित्त असण्याचे महत्त्व स्पष्ट करण्यात आले आहे.

१०) दहाव्या अभंगात श्रीहरीच्या नामस्मरणाचे महत्त्व स्पष्ट करण्यात आले आहे.

याप्रमाणे मंगलाचरणाच्या अभंगात परंपरेनुसार सर्वच देवतांचे वंदन आले असले तरी प्रत्येक अभंगात ज्ञानेश्वर माउलीचे स्मरण आवर्जून करण्यात आले आहे. जसे म्हटले आहे -

**मंगळ हे पाय हृदय चिंतिता । संसाराची व्यथा सुटे सर्व ।।१।।**
**मंगळ हे नाम मंगळ हे रूप । मंगळ संकल्प स्मरणाचा ।।२।।**
**मंगळ हे ध्यान मंगळ चिंतन । मंगळ गायन चौ अक्षरी ।।३।।**
**मंगळ चरण मंगलाचरण । ज्ञानेश्वर पूर्ण मायबाप ।।४।।**[१]

अर्थात्, माझे मायबापच असलेल्या ज्ञानेश्वर माउलीच्या चरणांचे स्मरण केले असता सर्व अमंगलांचा नाश होतो. संसाराची व्यथा सुटते. म्हणून ज्ञानेश्वरांच्या मंगल नामाचा संकल्प करावा. ज्ञानेश्वरांचे मंगल ध्यान करावे. ज्ञानेश्वर या चार अक्षरांचे गायन करावे. तेच सर्व मंगलदायक आहे. तेच मंगलाचरण होय.

गुरुच्या नात्याने ज्ञानेश्वरांचे स्मरण मंगल ठरते तर, श्रीकृष्ण हे त्यांचे आराध्य दैवत असल्यामुळे श्रीकृष्ण स्मरण हे देखील महाराजांच्या



मनाला आवडते. महाराज म्हणतात -

**सकळ मंगळ श्रीहरीचे नाम । इच्छिले ते काम पुरतील ।।१।।**
**नवमी षष्ठी भद्रा हो का व्यतिपात । जपता श्रीनाथ उत्तम ते ।।२।।**
**उदंड मुहूर्ते साधियेली कोटी । कृष्णावीण पोटी सौख्य नाही ।।३।।**
**ज्ञानेश्वरप्रभु उपाध्या सुजाण । श्रीकृष्णस्मरण मुहूर्त दे ।।४।।**[२]

श्रीहरीचे म्हणजेच भगवान श्रीकृष्णाचे नामस्मरण हे मंगलदायक असून या नामस्मरणाने सर्व कामना पूर्ण होतात. नवमी, षष्ठी, भद्रा, व्यतिपात अशा दोषयुक्त मुहूर्ताचा दोषही दूर होतो. श्रीकृष्ण नामस्मरणाशिवाय साधलेला कोणताही मुहूर्त व्यर्थच ठरतो. ज्ञानेश्वररूपी सद्गुरू उपाध्यायाने मला श्रीकृष्ण नामस्मरणाचा मुहूर्त पाहून दिला आहे.

याप्रमाणे मंगलाचरणाच्या अभंगात परंपरा बाळगूनही गणेशादी देवतांच्या वंदनाबरोबरच प्रत्येक ठिकाणी ज्ञानेश्वर माउली आणि श्रीकृष्ण स्मरण यांचा सातत्याने उल्लेख महाराजांनी केला आहे.

**सगुण रूपाविषयीचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगाच्या गाथेतील दुसऱ्या प्रकरणात सगुण रूपाविषयीचे अभंग आले आहेत. यामध्ये अ.क्र. ११ ते ४२ अशा ३२ अभंगांचा समावेश होतो. या अभंगात ज्ञानेश्वर माउली, प्रभू श्री. रामचंद्र, भगवान श्रीकृष्ण, भगवान श्री. नरसिंह, भगवान शिवशंकर इत्यादिकांचे ध्यान केले आहे. हे करीत भक्तीचा अन्वय व व्यतिरेक स्पष्ट करण्यात आला आहे.

भगवान श्रीकृष्णाचे ध्यान आपल्या प्रासादिक शैलीतील अभंगांनी स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**परमानंद मनी । हरी देखिला नयनी ।।१।।**
**रूप सांवळे चिद् बुंथी । पाहता तुटे अहंग्रंथि ।।२।।**
**सर्व शास्त्रांचे माहेर । रूप गोपीमनोहर ।।३।।**
**नाम मुखामाजी आले । रूप हृदयी राहिले ।।४।।**
**दीननाथ ज्ञानेश्वर । माथां दिला कृपाकर ।।५।।**[३]

अर्थात्, भगवान श्रीकृष्णाचे चैतन्यघन सावळे रूप पाहताच चित्ताच्या अहंकाररूपी ग्रंथी तुटतात आणि परमानंद दाटून येतो. भगवान श्रीकृष्ण हे सर्व शास्त्रांचे माहेर असून हे मनोहर रूप गोपीजनांनी वेष्टीले आहे. हे नाम माझ्या मुखी आले, हे रूप मी हृदयात पाहिले, तेव्हाच दीननाथ ज्ञानेश्वर माउलीने माझ्या मस्तकावर वरदहस्त ठेविला आहे.

श्रीहरिस्मरणाबरोबरच प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांना सद्‌गुरू ज्ञानेश्वर माउली ही देखील तितकीच वंदनीय आहे. त्यामुळे सगुणरूपाच्या ध्यानाच्या अभंगात ज्ञानेश्वर महाराजांचा उल्लेख प्रत्येक अभंगात तर झालाच आहे, पण त्याचबरोबर स्वतंत्र अभंगातही खालीलप्रमाणे ज्ञानेश्वरांचे ध्यान त्यांनी केले आहे.

**सुंदर ते ध्यान इंद्रायणीतीरी । सावळी गोजिरी मूर्ति मध्ये ।।१।।**
**पांडुरंगकर त्याचे आसन । सामोरे निधान निवृत्तिराज ।।२।।**
**सोपानमुक्ताबाई शोभती आणीक । नारदादि लोक पूजिताती ।।३।।**
**हृदयीचे गुह्य उमटले आता । अंतर्बाह्य चित्ता समभाव ।।४।।**
**ज्ञानेश्वर तात आणि कृष्ण पति । सौभाग्यसंपत्ति नित्य मज ।।५।।**[४]

प्रज्ञाचक्षू म्हणतात, इंद्रायणीच्या तीरावर उभ्या असलेल्या सावळया, गोजिऱ्या पांडुरंगाच्या मूर्तिपाशी मी ज्ञानेशाला पाहिले. पांडुरंगाचे कर हेच





त्याचे आसन आहे. त्याच्यासमोर निवृत्तीनाथ महाराज उभे आहेत. त्याच्या आजूबाजूला उभे असलेले सोपान महाराज आणि मुक्ताबाई त्यांना शोभा देतात. नारदादी कीर्तनकार त्याचे पूजन करतात. आता माझ्या हृदयात परमेश्वराचे गुह्य स्वरूप उमटले आहे. माझ्या चित्ताला अंतरबाह्य समभाव प्राप्त झाला आहे. श्री. ज्ञानेश्वर हे माझे वडील आहेत, मी त्यांची कन्या आहे. मी श्रीकृष्णरूपी पतीला वरले असून त्यायोगे मला नित्य सौभाग्य संपदा लाभली आहे.

त्याचप्रमाणे ज्ञानेशासह श्रीहरीचे स्मरण करीत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

**रूप सुंदर सावळे । पाहुनिया गर्व गळे ।।१।।**
**ब्रीद बांधले चरणी । निववाया दासजनी ।।२।।**
**माळ वैजयंती गळां । भाळी मृगमद टिळा ।।३।।**
**स्वामी आळंदीवल्लभ । कांत सुनीळ सुलभ ।।४।।**[५]

भगवान श्रीकृष्णाचे सावळे रूप पाहून माझा सर्व अभिमान गळून जातो. त्याच्या गळयातील वैजयंती माळा आणि भाळी लावलेला कस्तुरीचंदनाचा टिळा अतिशय सुंदर दिसतो. मी त्याच्या चरणाशी दास्यभावाने समर्पित आहे. आळंदीवल्लभ श्री. ज्ञानेश्वर हेच माझे स्वामी असून सुनील आणि सुलभ असा श्रीकृष्ण हाच माझा कांत म्हणजे पती आहे.

त्याचप्रमाणे अन्य अभंगातही श्रीकृष्णाचे रूप वर्णन करीत सगुण ध्यानाचा आविष्कारप्रज्ञाचक्षूंनी साधला आहे.

**रूप कोवळे कोवळे । राहे अग्रसूक्ष्म मोळे ।।१।।**
**रूप कोवळे कोवळे । पाहुनी उन्मीलती डोळे ।।२।।**
**रूप कोवळे कोवळे । चुंबन घ्यावे वाटे बळे ।।३।।**
**रूप कोवळे कोवळे । ज्ञानेश्वर कृपे कळे ।।४।।**[६]

प्रज्ञाचक्षू म्हणतात, भगवान श्रीकृष्णाचे कोवळे रूप पाहून मला स्थूल, सूक्ष्म असे हे जगत एकच झाल्यासारखे वाटते. हे कोवळे रूप पाहून माझे डोळे उन्मीलीत होतात. या कोवळ्या रूपाचे चुंबन घ्यावे असे मला वाटते. या रूपाचे रहस्य केवळ सद्‌गुरू श्री. ज्ञानेश्वर माउलीच्या कृपेने समजून येते.

ज्ञानेश्वर माउली आणि भगवान श्रीकृष्ण यांच्याबरोबरच कर्पूरगौर शिवाचेही ध्यान महाराजांनी सुंदर शब्दांत मांडले आहे.

**जीव माझा कासावीस । दृढ आस पायाची ।।१।।**
**केव्हां पाहीन मी डोळां । शिव भोळा सद्‌गुरू ।।२।।**
**जटेमाजी जन्हुसुता । उमा माता अर्धांगी ।।३।।**
**उरी उरगांच्या माळा । गळा निळा सुंदर ।।४।।**
**गुरु ज्ञानेश्वरताता । कृष्णकांता आळवी ।।५।।**[७]

प्रज्ञाचक्षू म्हणतात, शिवाचे भोळे भाबडे सद्‌गुरू रूपी ध्यान मी केव्हा पाहीन असे मला झाले आहे. त्या सद्‌गुरुचरणाची आस मला लागली असून त्याला पाहण्यास माझा जीव कासावीस झाला आहे. ज्याच्या जटेमध्ये जह्नुची कन्या जाह्नवी म्हणजेच गंगा आहे आणि उमा ज्याची अर्धांगिनी आहे, ज्याच्या गळ्यामध्ये सर्पांच्या माळा शोभतात अशा नीळकंठाचे ध्यान, ज्याचे वडील श्री. ज्ञानेश्वर आहे आणि ज्याचा पती श्रीकृष्ण आहे, असा मी करीत आहे.



भगवान शिवशंकराप्रमाणेच प्रभू श्रीरामचंद्राचेही ध्यान महाराजांनी केले आहे.

**शरयूतीरी राम कौसल्येचे बाळ । दिसे घननीळ मेघतनू ।।१।।**
**चिमण्या पादुका चिमणा पितांबर । चिमणे तोडर गजरे वाकी ।।२।।**[८]

प्रज्ञाचक्षू म्हणतात, शरयूतीरी असलेले कौसल्यानंदन रामाचे घननीळ असे कोवळे रूप मी पाहात आहे. त्याच्या या चिमण्या पादुका व चिमणा पितांबर आणि हातापायातील चिमण्या तोडे आणि वाळे मला सुखावत आहेत.

याप्रमाणे विविध सगुण रूपात साकार होणाऱ्या परमेश्वराचे ध्यान करीत प्रज्ञाचक्षूंनी भक्तीचे रहस्य खालीलप्रमाणे स्पष्ट केले आहे.

**वेदाचे रहस्य देखियेले डोळा । हृदयी सांवळा व्यापक हा ।।१।।**
**व्यतिरेके एक अखंड हृदयी । अन्वये ते ठायी विश्वभरी ।।२।।**
**ज्ञानेश्वरकन्या रूप पाहोनिया । स्वये झाली मायाविरहित ।।३।।**[९]

सगुण ध्यानाच्या या रूपातच हृदयाच्या अंतरात सावळे रूप पाहत असताना मला वेदाचे रहस्य साक्षात् डोळ्यांना दिसून आले. व्यतिरेकाने ते माझ्या हृदयात अखंड वास करते, तर अन्वयाने ते अवघे विश्व व्यापून राहाते. अन्वयव्यतिरेकाने भरलेले हे रूप पाहून ज्ञानेश्वरकन्या मायेच्या बंधनातून मुक्त झाली.

याप्रमाणे सगुण ध्यानाच्या अभंगात प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनी प्रामुख्याने ज्ञानेश्वर माउली आणि भगवान श्रीकृष्ण यांचे ध्यान केले असले तरी, त्याचबरोबर भगवान श्रीरामचंद्र, भगवान श्री. नरसिंह आणि भगवान श्री. शिवशंकर यांचेही ध्यान केले आहे. सगुण ध्यानाचा हा मार्ग देहांतील अन्वयव्यतिरेकाचा साक्षात्कार घडवून मायेच्या बंधनातून मुक्त

करणारा आहे.

**नामपर अभंग :**

सर्व संतांनी नामस्मरण हा परमेश्वर प्राप्तीचा सुलभ सोपा मार्ग आहे असेच म्हटले आहे. यज्ञ, योग, वेदाचा अभ्यास अशा अवघड साधनांपेक्षा कोणालाही करता येणारे नामस्मरणाचे साधन हेच सर्वोत्कृष्ट आहे. असेच सर्व संतांनी प्रतिपादन केले आहे. प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज देखील याला अपवाद नाहीत. प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील तिसरे प्रकरण नामसंकीर्तनाच्या अभंगाला वाहिलेले आहे. यामध्ये अ.क्र. ४३ ते ८६ असे एकूण ४४ अभंग येतात. या अभंगांतून विविध प्रकारे नामस्मरणाचा महिमा स्पष्ट करण्यात आला आहे.

नामस्मरणाचे महत्त्व स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

**कोण उभा आहे सृष्टी । मशी करावया गोष्टी ।**
**नामावीण तत्त्वदृष्टी । दुसरे दाखविता ।।१।।**
**मंथा मंथा चारी वेद । सोडा शास्त्रातील शब्द ।**
**दृढ करा आता वाद । नामबाध दावुनी ।।२।।**
**धुंडा सकळ पुराणे । करा जे तुम्हा करणे ।**
**परी आम्हासी स्मरणे । पासुनिया सोडवा ।।३।।**
**म्हणुनीया ऐसे आहे । नामावीण तत्त्व नोहे ।**
**ग्वाही ज्ञानेश्वरपाय । तुम्हाकृपे आकळी ।।४।।**[१०]

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात, या विश्वामध्ये माझ्याशी बोलू शकणारा, नामस्मरणाला वगळून वेगळी तत्त्वदृष्टी देणारा, एका





नामाशिवाय एखादे वेगळे तत्त्व दाखवून देणारा असा कोणी आहे का? अर्थातच नाही! चारही वेदांचे मंथन केले तरी एका नामस्मरणावाचून दुसरे काहीही आढळून येणार नाही. म्हणून शास्त्रातील सर्व सिद्धांतांचा त्याग करा आणि नामस्मरण हाच तरणोपाय आहे असा वाद उभा करा. सर्व पुराणांचा धांडोळा घ्यावयाचा, तो घ्यावा आणखीही जे काही करावयाचे ते करावे, परंतु आम्ही मात्र केवळ नामस्मरणाचीच कास धरणार आहे आणि त्यासाठीच आम्ही सद्गुरू श्री. ज्ञानेश्वर माउलीचे चरण धरले आहेत.

याप्रमाणे नामस्मरण हेच सर्व वेद पुराणांचे सार आहे, हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

**प्रभातसमयी म्हणा शेषशायी । देवोनीया वाही पार करा ।।१।।**
**रामकृष्ण हरी गोविंदा माधवा । विष्णु वासुदेवा गोपवेशा ।।२।।**
**ऐसिया नामाने तुटतील पाश । जडेल की आस हरिपदी ।।३।।**
**ज्ञानेश्वरप्रभु थापटोनी आतां । उठवोनि माथां कर ठेवी ।।४।।**[११]

सकाळच्या वेळी शेषशायी भगवान श्री. विष्णुचे नामस्मरण करावे. राम, कृष्ण, हरी, वासुदेव, गोविंद, माधव, गोपाळ अशा विष्णुच्या नामस्मरणाने या संसाराचे पाश तुटून संसार सागर तरून जाण्यास मदत होते. नामस्मरणाने हरिपदी म्हणजे परमेश्वराचे ठायी दृढ श्रद्धा जडते. अशाप्रकारे ज्ञानेश्वर माउली मला जागे करून माझ्या मस्तकावर वरदहस्त ठेवीत आहे.

प्रकारांतराने नामस्मरणाचे महत्त्व स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू लिहितात,

**रामकृष्णनामे पतित तरती । व्यासें भागवती वर्णियेले ।।१।।**
**नामधारकांच्या संगती लागोनी । उद्धरती जनी पक्षी पशु ।।२।।**
**भलतीया मिषे नाम मुखी येवो । वैकुंठीचा रावे झडपितो ।।३।।**
**ज्ञानेश्वरप्रभु नामाचा महिमा । नकळे निगमा स्वर घेता ।।४।।**[१२]

भगवान वेदव्यासांनी भागवतात असे म्हटले आहे की, रामकृष्ण हरी या नामजपाने सर्व पापीजन तरून जातात. नामस्मरण करणाऱ्यांच्या संगतीला लागून पशुपक्षी सुद्धा उद्धरून जातात. अगदी चुकून जरी प्रभूनामस्मरण घडले तरी वैकुंठीचा राणा धावत येतो. असा हा नामाचा महिमा ज्ञानेश्वर प्रभूंनी मला सांगितला. तो निगमागमांनाही कळून येत नाही.

नामस्मरण हेच अमृतत्त्व प्राप्त करून देणारे आहे, हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**नाम साजर साजर । करी फुकट अमर ।।१।।**
**दुजी क्रिया नको काही । मुखे गावा शेषशायी ।।२।।**
**पळ रिती नसो वाणी । डोळां यावे प्रेमपाणी ।।३।।**
**मग दुजे नको काही । मुखी गावा शेषशायी ।।४।।**
**म्हणे ज्ञानेश्वरबाळा । हेंचि आवडे गोपाळा ।।५।।**[१३]

परमेश्वराचे साजरे नामस्मरण नेहमी करीत राहावे. दुसरे कोणतेही कर्म करावयाची गरज नाही. याशिवाय दुसरे काही करू नये. मुखाने शेषशायीचे नाम घेताना डोळ्याला पाणी यावे. असे हे नावच अमरत्व प्राप्त करून देते. हेच ज्ञानेश्वराच्या बाळाला आवडते, तेच गोपाळालाही आवडते.

भवसागराच्या बंधनात पडलेल्या जीवाचा उद्धार करण्यासाठी प्रभूनामस्मरण हेच औषध आहे असे आवर्जून सांगत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

**नाम भेषज भेषज । भव नाशिते सहज ।।१।।**
**नाम अनळ अनळ । जाळी पातकांचे मूळ ।।२।।**
**नाम जीवन जीवन । ताप शमविते तीन ।।३।।**
**नाम गोड नाम गोड । ज्ञानेश्वर पुरवी कोड ।।४।।**[१४]





प्रज्ञाचक्षू म्हणतात, नामस्मरण हेच भवरोगाचा नाश करणारे रामबाण औषध आहे. नामस्मरण हेच अग्निसारखे असून संचित पापाचा नाश करणारे आहे. नामस्मरण हेच पाण्यासारखे शीतल असून आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक अशा त्रिविध तापांची शांती करणारे आहे. असे हे, मधुर नाम देवून ज्ञानेश्वर माउलीने माझे लाड पुरविले आहेत.

नामस्मरणाचे हे महत्त्व, हरिभक्तीचा उद्घोष श्रीमद्भागवताच्या रचनेने करणाऱ्या भगवान वेदव्यासांनी केला आहे. याचे स्मरण देत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

**चहूंही वेदांचे काढोनिया सार । निर्मिले सुंदर भागवत ।।१।।**
**तया भागवती सार रामकृष्ण । सकल सहिष्णु भक्तान्याय ।।२।।**
**आंतरबाहेरी व्यापिले सर्वत्र । पवित्रापवित्र नाही नामी ।।३।।**
**विप्रक्षत्री वैश्य शूद्र चारी वर्ण । नामेचि पावन निःसंशय ।।४।।**
**ज्ञानेश्वरमुखे परी ते जाणोनी । हृदयी आणोनी दावी देव ।।५।।**[१५]

प्रज्ञाचक्षू म्हणतात, भगवान वेदव्यासांनी चारही वेदांचे सार काढून सर्वांग सुंदर असे भागवत पुराण रचले. या भागवताचे सार म्हणजे 'रामकृष्ण हरी' हा मंत्र. सकल सहिष्णु अशा भक्तांचा न्याय करणारा श्रीहरी हाच या भागवतात वर्णिला आहे. परमेश्वरीतत्त्व हेच नामाच्या रूपात अभिव्यक्त झाले असून हे नामच आंतर्बाह्य व्यापून राहिले आहे. नामस्मरणाला सोवळ्या-ओवळ्याचे काही बंधन नाही. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शुद्र हे चारही वर्ण नामस्मरणानेच तरून जातात. मी हे नाम ज्ञानेश्वर मुखातून जाणले आणि माझ्या हृदयी बिंबवले.

नामस्मरणाचा महिमा वर्णन करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात,

तुझे नामसंकीर्तन । वर्णोत ये लोक तीन ।।१।।
विघ्न न येवो त्या ठायी । विश्व भरो प्रेमबाही ।।२।।
गोविंद गोविंद । गाता सर्वदा आनंद ।।३।।
षडरीचा पराजय । नाममात्रे तुमच्या होय ।।४।।
करू काज एकमेळा । ज्ञानेश्वरा जयमाळा ।।५।।[२६]

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात, हे परमेश्वरा, तुझे नामस्मरण या तीनही लोकांत भरून राहो. नामस्मरणात केव्हाही विघ्न न येता ते विश्वामध्ये प्रेमप्रवाहाच्या रूपाने वाहत राहो. गोविंद गोविंद असे गाताना सर्वत्र आनंद भरून उरतो. हे परमेश्वरा तुझ्या नामस्मरणाने षडरिपूंचा म्हणजेच काम, क्रोध, लोभ, दंभ, मद आणि मत्सर या दोषांचा पराजय होतो, असे ज्ञानेश्वरकन्या म्हणतात.

नामस्मरणाचे हे साधन सर्वांसाठी खुले आहे हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

वेदशास्त्री मज नाही अधिकार । न कळेचि सार पुराणाचा ।।१।।
आणिक साधन न पुरे जीवित । सर्वांपरि आर्त दीननाथा ।।२।।
एकचि आधार आहे विश्वासाचा । मनकायावाचा तेथ राहो ।।३।।
होईल ते होवो ज्ञानराज नावे । दिननिशी गावे तेचि परी ।।४।।[२७]

प्रज्ञाचक्षू म्हणतात, मला वेदशास्त्राचा अधिकार नाही, मला पुराणाचा अर्थ कळत नाही, योगासारख्या इतर साधनांचे आचरण करावे म्हटले तर जीवन अपुरे पडते. तेव्हा सर्व काही सोडून दीननाथ श्रीहरीची करुणा भाकावी. काया, वाचा, मने त्याचेच होऊन रहावे, त्याचेच नामस्मरण करावे, रात्रंदिवस तेच गावे, जे व्हावयाचे ते होवो!





इतर साधनांची उठाठेव ही देखील कष्टदायकच आहे. त्यापेक्षा नामस्मरण सोपे आहे, हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

व्रत करू तरी नोहे उपवास । घेताही संन्यास तृष्णा वाढे ।।१।।
तप करू तरी अधीर जीवित । दान द्याया वित्त नाही नाही ।।२।।
पुण्य करू तरी वैगुण्याची भीति । न जाय वेदान्ती संशयचि ।।३।।
आता तुझ्या नावे वाटे समाधान । ज्ञानदेवगान करिताचि ।।४।।[२८]

व्रतवैकल्याचे आचरण करू म्हटले, तर माझ्याकडून उपास होत नाही. संन्यास घ्यावा म्हटले तर कामवासना वाढते. तप करू म्हटले तर निश्चय होत नाही. दान द्यावे म्हटले तर धन नाही. पुण्य करू म्हटले तर कर्मात कोठे चूक घडेल अशी भीती वाटते. वेदांत विचार करावा म्हटले तर संशय बळावतो. म्हणून हे परमेश्वरा, तुझ्या नामस्मरणासारखा सोपा मार्ग नाही. ज्ञानदेव ज्ञानेश्वर देखील तुझेच नामस्मरण करतात. तुझ्या नामस्मरणाने मला समाधान वाटते.

स्थितप्रज्ञ समत्वदृष्टी प्राप्त होणे हेच योगसाधनेचे उद्दिष्ट असते. नामस्मरणाने ते सहजच प्राप्त होते. हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज म्हणतात -

घेता गोविंदाचे नाम । सुष्ट दुष्ट होती सम ।।१।।
नाममहिमा मानिता । न ये कोणा धिक्कारिता ।।२।।
क्रूर पापी साधु शांत । नामगाता भगवंत ।।३।।
परी हेही बरवे झाले । अनौषधि रोग गेले ।।४।।
म्हणे ज्ञानेश्वरबाळा । निश्चयाचा धरी चाळा ।।५।।[२९]

परमेश्वराचे नाम घेताच सज्जन आणि दुष्ट या दोघांप्रती समान

दृष्टी होते. नामस्मरणाचा महिमा स्वीकारला की, कोणाचाही धिक्कार करता येत नाही. भगवंताचे नाम गाताच क्रूर आणि पापी, साधू आणि शांत सर्व सारखेच होतात. ही देखील चांगलीच बाब आहे की, कोणत्याही औषधीशिवाय भवरोगाचे निवारण होते. ज्ञानेश्वरकन्येने नामस्मरण निष्ठेने करण्याचाच निश्चय केला आहे.

याप्रमाणे नामस्मरणाच्या विविध अभंगांतून प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनी नामस्मरणाचा मार्ग चारही वर्णांना खुला असल्याचे स्पष्ट करून त्याचे आचरण करणे अत्यंत सोपे आहे. नामस्मरण हेच भवसागर तरून जाण्याचा एकमेव मार्ग आहे. तेच चारही वेदांचे सार आहे. नामस्मरणाचा हा महिमा भगवान वेदव्यासांनी भागवतात वर्णन केला आहे. प्रज्ञाचक्षूंनी ज्ञानेश्वर कृपेने हा नामस्मरण योगच साधन म्हणून अवलंबिलेला आहे.

**संतमहिमापर अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील चौथे प्रकरण 'संतमहिमा' या विषयाला वाहिलेले असून अ.क्र. ८७ ते १३२ अशा ४६ अभंगांचा समावेश करण्यात आला आहे. या अभंगांत संत, सज्जन, महात्म्यांचे महत्त्व वर्णन करण्यात आले आहे. संत-सज्जन हे भूतलावरील कल्पतरूच होत, हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**सायासावांचोनी कल्पतरु भेटे । मग का ओखटे धातुशोध ।।१।।**
**तैसा संतसंगे सापडतो हरी । मग शास्त्र करी कार्य काय ।।२।।**
**लाभता अमृत कासया औषध । तैसे ज्ञान शुद्ध गुरुमुखे ।।३।।**
**ज्ञानेश्वरप्रभु सर्वदां कृपाळू । बहू कळकळ जीवांची त्या ।।४।।**[२१]

एखाद्याला जर कोणताही प्रयत्न न करता अचानक कल्पतरू गवसला तर तो सोने-चांदीसारख्या धातूंचा शोध घेत बसणार नाही. त्याचप्रमाणे



ज्याला संतसंग सापडला तो शास्त्रांचा धांडोळा घेत बसणार नाही. अमृताचा लाभ झाला तर औषध कशाला शोधावयाचे? तसेच सद्‌गुरुमुखाने अनुभूतीचे ज्ञान प्राप्त झाले तर शास्त्रग्रंथ कशाला वाचावयाचे? ज्ञानेश्वर माउली कृपाळू आहे, तिची माझ्यावर कृपा आहे तशीच सर्वभूतमात्रांवर कृपा आहे.

सिद्धी प्राप्त करण्यासाठी लोक मंत्रादिकांची अनुष्ठाने करून देवतांची उपासना करतात. देवता प्रसन्न झाल्या तरी कामक्रोधादि विकारांचा उपशम होत नाही. ही देवतोपासनेतील त्रुटीच आहे, असे स्पष्ट करीत महाराज म्हणतात-

**देव जरी झाला सिद्ध । तरी न मोडे हा क्रोध ।।१।।**
**संतसंग होय जेव्हा । प्रकटत शांति तेव्हा ।।२।।**
**देवभेटी अभिमान । संतभेटी ब्रह्मपण ।।३।।**
**ऐशी सत्संगाची रीति । जडे ज्ञानेश्वरी प्रीती ।।४।।**[२२]

देव जरी प्रसन्न झाला तरी क्रोध जात नाही. परंतु संतसंग होतो तेव्हा शांती स्थिरावते. देव प्रसन्न झाल्याने अभिमान मात्र वाढतो, पण सत्संग घडला तर मात्र ब्रह्मस्थिती अनुभवास येते. सत्संगाचा महिमा हा असा आहे. म्हणूनच माझे प्रेम ज्ञानेश्वरांवर जडले आहे.

संतसज्जनांची आर्त विनवणी करीत महाराज म्हणतात,

**तुम्हा संता विनवणी । एवढीच दीनवाणी ।।१।।**
**मायबापांपरी देवा । माझा सांभाळ करावा ।।२।।**
**नेणे योग ब्रह्मज्ञान । नेणे आगमोक्त ध्यान ।।३।।**
**नेणे थोरांचिया उक्ति । नेणे वैराग्य हरिभक्ति ।।४।।**
**परी एक भरवंसा । चित्ती ज्ञानेश्वरठसा ।।५।।**[२३]

तुम्हा सर्व संतांना माझी अशी कळकळीची विनंती आहे की, माझा सांभाळ करावा, मायबापांसारखे माझ्याकडे लक्ष ठेवावे. मला ब्रह्मज्ञान नको, मला आगमोक्त तंत्रज्ञान, ध्यानधारणेचे ज्ञान नको, मला थोरामोठ्यांचे उपदेश नकोत, मला संन्याशांचे वैराग्य नको, मला फक्त हरिभक्ती करणाऱ्या संतसज्जनांचा संग हवा आहे.

सत्संग हा वेदाहूनही श्रेष्ठ आहे असे प्रतिपादन करीत महाराज म्हणतात,

**आत्मप्रीति श्रेष्ण वर्णिताती वेद । सांगता अभेद बहु खूण ।।१।।**
**आत्म्याहूनि श्रेष्ठ म्हणावा गोविंद । तेथे प्रेम शुद्ध ठेवावा की ।।२।।**
**ऐसे वर्णिताती जीवेभावे संत । म्हणूनी निश्चित थोर तेचि ।।३।।**
**स्वार्थपर वेद आत्मप्रीति सांगे । देवप्रीति आंगे संत वाणी ।।४।।**
**म्हणोनिया वेद तोंडेचि म्हणावा । संताते घालावा दंडवत ।।५।।**
**वेद तो पुस्तकी ठेवावा झाकून । वंदावे सज्जन प्रेमभावे ।।६।।**
**वेदाहूनि थोर संतजन कोटी । भागवता पोटी हाचि भाव ।।७।।**
**संतदृष्टीपुढे उभा नारायण । आणिक साधन तैसे नाही ।।८।।**
**ज्ञानेश्वर माय माझी सर्वा भूती । सज्जन ते चित्ती वंदोनिया ।।९।।**[२३]

वेदांनी अद्वैताचा उपदेश करीत आत्मप्रीती ही सर्वश्रेष्ठ म्हटली आहे. परंतु त्याहीपेक्षा गोविंदाचे ठायी प्रेम ठेवणे हेच श्रेष्ठ आहे असे संतांनी सांगितले आहे, म्हणून संत हेच श्रेष्ठ ठरतात. वेदांनी सांगितलेली आत्मप्रीती ही तशी स्वार्थपरकच आहे. संत मात्र भगवंतावर प्रेम करावे असे सांगतात. म्हणून तोंडाने जरी वेद म्हटला तरी दंडवत मात्र संतांना घालावे. पुस्तकातला वेद पुस्तकात राहू द्यावा आणि सत्संगाची कास धरावी. हे संतसज्जन कोटीवेदाहूनही श्रेष्ठ होत. हाच भागवतधर्म होय. संतांच्या दृष्टीपुढे साक्षात् नारायण उभा





असतो, तशी ज्ञानेश्वर माउली माझ्या अंत:चक्षूंसमोर उभी आहे. तीच सर्व भूतमात्रांचे ठायी आत्मरूपाने प्रकट झाली आहे, तिला माझे वंदन असो.

हीच भूमिका प्रकारांतराने मांडत महाराज म्हणतात -

**केलिया वांचोनि संताची संगती । नाकळे श्रीपति कोण्या गुणे ।।१।।**
**पढताहि वेद वाचिता पुराणे । चित्त अभिमाने जाकळीले ।।२।।**
**पूर्वपुण्ये भेटे संतसमागम । तेव्हा भवभ्रम सर्व जाय ।।३।।**
**ज्ञानेश्वरकन्या सांगत आवडी । प्रेमाच्या कावडी संतसंगे ।।४।।**[२४]

सत्संग घडल्याशिवाय भगवंताचे स्वरूप कळून येत नाही. वेदशास्त्रे वाचली तर पांडित्याचा अभिमान वाढतो. परंतु पूर्व पुण्याईने सत्संग घडला तर मात्र सर्व भ्रम नष्ट होऊन जीव संसारसागरातून तरून जातो. म्हणूनच मला ज्ञानेश्वर माउलीची संगती आवडते.

याप्रमाणे महाराजांनी आपल्या संतसंगतीच्या अभंगातून संतमहिमा वर्णन केला आहे. महाराजांच्या दृष्टीने देवता प्रसन्न झाल्याने होणाऱ्या लाभाहून संतमहिमा महत्त्वाचा आहे. देवकृपेने सिद्धी प्राप्त झाल्या तरी अहंकार बळावतो, मात्र संतमहिम्याने काम-क्रोधादि विकारांचा उपशम होऊन साधक परमावस्थेची वाटचाल करू लागतो.

**सद्‌गुरू महिमापर अभंग :**

भारतीय संस्कृतीतच नव्हे तर या पृथ्वीतलावरील सर्व धर्मपरंपरेत सद्‌गुरुचे महत्त्व सर्वांनीच मान्य केले आहे. मायबाप हे आपल्याला जन्म देतात, त्यांच्यामुळे आपल्याला शरीर लाभते. परंतु सद्‌गुरुच्या सान्निध्यात मनुष्य सुसंस्कृत होतो. साधना करून मुक्तीच्या पथाची वाटचाल करू लागतो. सद्‌गुरुचे हे अनन्यसाधारण असे महत्त्व जाणूनच भारतीय संस्कृतीत गुरुवंदना

करीत म्हटले आहे -

**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः**
**गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ।।**

गुरू हाच ब्रह्म आहे, गुरू हाच विष्णू आहे, गुरू हाच महेश आहे, गुरू हेच परब्रह्म आहे म्हणून मी गुरुला नमस्कार करतो.

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनीही आपल्या अभंगातून सद्‌गुरू महिमा वर्णन केला आहे. प्रज्ञाचक्षूंच्या अभंगाच्या गाथेतील पाचवे प्रकरण 'सद्‌गुरुमहिमा' या विषयाला वाहिलेले असून यात १३३ ते १८३ अशा ५१ अभंगांचा समावेश करण्यात आला आहे. या अभंगांतून आपल्या प्रासादिक शैलीने महाराजांनी सद्‌गुरुमहिमा वर्णन केला आहे.

देवापेक्षा गुरू श्रेष्ठ कसा आहे ते स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**जैसा देव तैसा गुरु । ऐसा श्रुतीचा निर्धारु ।।१।।**
**देव न दावी सद्‌गुरु । गुरु दावी शारंगधरु ।।२।।**
**म्हणोनि सद्‌गुरु महिमा । नाही कळला निगमा ।।३।।**
**देवाहुनी गुरु श्रेष्ठ । श्रुति उणे बोले स्पष्ट ।।४।।**
**ज्ञानेश्वरप्रभु तात । सर्ववेद अधिष्ठित ।।५।।**[२५]

जसा देव तसा गुरू, असे श्रुतिवचन असले तरीही देव सद्‌गुरुची प्राप्ती करून देऊ शकत नाही. गुरू मात्र परमेश्वरप्राप्ती करून देतो आणि म्हणूनच सद्‌गुरुचा महिमा शास्त्रग्रंथांना समजून आला नाही असेच म्हणावे लागते. देवाहून गुरू हाच श्रेष्ठ ठरतो आणि श्रुतीचे म्हणणे चुकीचे ठरते. म्हणूनच माझे वडील ज्ञानेश्वरमाउली हेच सर्व वेदांचे अधिष्ठान आहे.



सद्‌गुरू कृपेशिवाय सर्व साधना व्यर्थ ठरते, उपासना व्यर्थ ठरते हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**सद्‌गुरुवाचोनी कर्मकांडबळे । कधीही नाकळे चित्तशुद्धि ।।१।।**
**सद्‌गुरुवाचोनी ईश्वरोपासना । कधीही सगुणा भेटवीना ।।२।।**
**सद्‌गुरुवांचोनी ब्रह्मज्ञानठेवा । कधीही न जीवां मुक्त करी ।।३।।**
**देवाचिये ठायी जैसी भक्ति परा । गुरुचरणी थारा तैसा व्हावा ।।४।।**
**तरीच ते कळे बोलियले काही । अन्यथा तो नाही उपायचि ।।५।।**
**ज्ञानेश्वरप्रभु कृपेचा सागर । करी दीनोद्धार दृष्टिमात्रे ।।६।।**[२६]

सद्‌गुरुकृपेवाचून बळे बळेच कर्मकांड करण्याने चित्तशुद्धी घडून येत नाही. सद्‌गुरुच्या मार्गदर्शनाशिवाय ईश्वरोपासना केल्यास परमेश्वर प्राप्त होत नाही. सद्‌गुरुवाचून मिळालेल्या ब्रह्मज्ञानाने मुक्ती मिळत नाही. देवाच्या ठायी जशी पराभक्ती बाळगावी तसाच भाव सद्‌गुरुचरणाविषयी धरावा. तरच शास्त्राचे सार कळून येते. अन्यथा सर्वकाही परिश्रममात्र आहे. ज्ञानेश्वर हे कृपेचे सागर आहेत त्यांनी माझ्यासारख्या दीनजनांचा केवळ दृष्टिक्षेपानेच उद्धार केला.

गुरुकृपा झाल्यावर खरे भाग्य उदयाला येते हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**भाग्य उदय झाला । प्राणप्रिय तुम्ही आला ।।१।।**
**गीतार्थाच्या कावडी । बाळा देतसां आवडी ।।२।।**
**प्रेमे अंगिकारा जया । मग वंद्य तो ब्रह्मिया ।।३।।**
**स्वामी ज्ञानेश्वरकन्या । यश गाउनिया धन्या ।।४।।**[२७]

प्राणप्रिय असा सद्‌गुरु प्राप्त झाला तेव्हाच खरा भाग्याचा उदय झाला त्यानेच मला गीतार्थाचे दुग्धामृत पाजविले. त्यानेच माझा प्रेमाने अंगीकार

केला. त्याला वंदन करून, त्याचे गुण गाऊन मी ज्ञानेश्वरकन्या धन्य झाले.

सद्‌गुरुचा लाभ होताच मनस्थिती कशाप्रकारची होते याचे उत्कट भावाने वर्णन करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**पाय पाहियले जेव्हा । भव तेव्हां भूललो ।।१।।**
**पादसेवा जेव्हां केली । तेव्हां गेली वासना ।।२।।**
**जंही शिरी दिला हात । झालो नाथ विश्वाचा ।।३।।**
**जेव्हां प्यालो प्रेमदुग्ध । शुद्धाशुद्ध आटले ।।४।।**
**जेव्हां ऐकिले वचन । झालो पूर्ण अनादि ।।५।।**
**जेव्हा पाळियली आज्ञा । गुरुसंज्ञा पावलो ।।६।।**
**जेव्हा सेवियले तीर्थ । सतासत हारपले ।।७।।**
**जेव्हां पूजिले भक्तीने । होणे जाणे मीटले ।।८।।**
**ज्ञानेश्वर मायबाई । सुख ठायीं व्यापक ।।९।।**[२८]

मी जेव्हा सद्‌गुरुचरणापाशी आलो तेव्हा या प्रपंचाचे अस्तित्वच विसरून गेलो. मी जेव्हा सद्‌गुरुचरणाची सेवा केली तेव्हा माझ्या वासना नष्ट झाल्या. त्यांनी माझ्या मस्तकावर हात ठेवला तेव्हा मी विश्वाचा स्वामी झालो. त्यांच्या प्रेमरसाचे पांग करून मी शुद्धाशुद्धता विसरलो. त्यांची वचने ऐकून मी अनादि आणि अनंत झालो. त्यांची आज्ञा पालन करून मी स्वतःच गुरुस्थानी प्राप्त झालो. त्यांच्या चरणाचे तीर्थ घेऊन मी सदसतांच्या पलिकडे गेलो. त्यांचे मी भक्तीने पूजन केले तेव्हा जन्ममृत्यूचा फेरा चुकला. अशी ही माझी ज्ञानेश्वरमाउली ही सर्व सुखांचे व्यापक अधिष्ठान आहे.

याप्रमाणे सद्‌गुरुचा लाभ होणे म्हणजेच सर्व काही प्राप्त होणे होय, असे म्हणत महाराज म्हणतात -



**सर्व सुख आले हातां । पाणी माथां गुरूचा ।।१।।**
**डोळां पाहतांचि पाय । दुरपाय आटले ।।२।।**
**विघ्ने निवारिली कोटी । सुख पोटी फावले ।।३।।**
**आतां ज्ञानेश्वरगुरु । नमस्कार निर्भय ।।४।।**[२९]

सद्‌गुरुची प्राप्ती होऊन त्यांनी माझ्या मस्तकावर हात ठेवताच सर्व सुख माझ्यासमोर उभे राहिले. त्यांनी मला पाहताच सर्व साधने प्रकट झाली. माझ्या पापांचा अंत झाला. सर्व विघ्नांचे निवारण झाले आणि माझ्या पोटी सुख सामावले, मी निर्भय झालो, कारण आता ज्ञानेश्वरमाउली हीच माझी गुरू आहे.

याप्रमाणे सद्‌गुरुमहिम्याच्या आपल्या अभंगातून महाराजांनी गुरुमहिमा अत्यंत भावपूर्ण शब्दांत वर्णन केला आहे. महाराजांच्या दृष्टीने गुरुकृपेशिवाय सर्व शास्त्रे, सर्व साधना, सर्व उपासना व्यर्थ होत. सद्‌गुरुचरण हेच सर्व सुखांचे निधान आहे.

**उपासना - मानसपूजाविषयीचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील सहावे प्रकरण उपासनाविषयक अभंगांचे आहे. यामध्ये १८४ ते २९८ अशा एकूण ११५ अभंगांचा समावेश करण्यात आलेला असून त्यातच २४६ ते २५८ असे १३ मानसपूजेचे अभंगही समाविष्ट आहेत.

उपासना कशी करावी हे स्पष्ट करीत, 'ॐ नमो भगवते वासुदेवाय:' या द्वादशाक्षरी मंत्राचे अनुष्ठान करावे, असा उपदेश महाराजांनी केला आहे. याविषयीचा अभंग असा.

**ब्राह्ममुहूर्ती उठोनि । स्नात बैसावे आसनी ।।१।।**
**करूनी स्ववर्णसंध्या । आठवावे जगद्वंद्या ।।२।।**
**भावे कीजे प्राणायाम । चित्ती घ्यावा मेघःश्याम ।।३।।**
**बारा अक्षराचा मंत्र । सदा स्मरावा पवित्र ।।४।।**
**ऐसे करी ध्रुव बाळा । दया येते घननीळा ।।५।।**
**ऐसे सांगोनि नारद । गेले वैकुंठासी सिद्ध ।।६।।**
**तोचि धरूनियां क्रम । जनी करावा संभ्रम ।।७।।**
**ज्ञानेश्वरप्रभुकृपा । तरी मार्ग मिळे सोपा ।।८।।**[३०]

सकाळी ब्राह्ममुहूर्ती (पहाटे ४ ते ६ हा ब्राह्ममुहूर्त होय), स्नान करून आसनावर बसावे. आपल्या वर्णाश्रमानुसार संध्या करावी. जगताला वंद्य असलेल्या परमेश्वराला आठवावे. भावपूर्वक प्राणायाम करावा. चित्तात श्रीकृष्णाचे ध्यान करावे आणि बारा अक्षरांचा म्हणजेच 'ॐ नमो भगवते वासुदेवाय:' हा पवित्र मंत्र जपावा. ध्रुव बाळाने असेच केले. तेव्हा त्यास भगवान विष्णू प्रसन्न झाले. हा मंत्र जपूनच नारदादि महर्षी वैकुंठास गेले. या मंत्रानेच साधकाचे सिद्ध झाले. हे लक्षात घेऊन आपणही तसेच आचरण करावे, असे केले म्हणजे ज्ञानेश्वरमाउलीची कृपा होऊन या संसारचक्रातून सुटण्याचा सोपा मार्ग गवसतो.

सर्व साधनांपेक्षा हरिस्मरण हेच सर्वश्रेष्ठ आहे आणि मला तेच हवे. हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**कोणा असो पूर्ण ज्ञान । कोणी करो धर्मदान ।**
**कोणा येवो योग ध्यान । मज अभिधान हरीचे पुरे ।।१।।**
**कोणी करो वेदाध्ययन । कोणी स्थापो देवार्चन ।**
**कोणी पुस्तके वाचोन । बहु भाषण करोत ।।२।।**





**कोणा असो तीव्रबुद्धि । कोणी भोगो अष्टसिद्धी ।**
**कोणा होवो पुण्यवृद्धि । मी जो गुणनिधी हरी सेवी ।।३।।**[३१]

कोणाला पूर्ण ज्ञान असो, कोणी दानधर्मी कर्मे करोत, कोणाला योग सिद्ध असो, कोणाला ध्यान सिद्ध असो, कोणी देवतांची पूजा करोत, कोणी वेदाध्ययन करोत वा कोणी पुष्कळ पुस्तके वाचून भाषणे देवोत, कोणाची बुद्धी तीव्र असो वा कोणी पुण्यवान असो वा कोणाला अष्टमहासिद्धी प्राप्त असोत, मला मात्र हरिस्मरणाची ओढ आहे. सर्वकल्याणगुणसंपन्न अशा श्रीहरीचे स्मरण करणे हेच माझ्यासाठी सर्वश्रेष्ठ साधन आहे.

द्वादशाक्षरी मंत्रजपाप्रमाणेच 'ॐ नमो नारायणाय' हा अष्टाक्षरी मंत्रजपही करावा. असा उपदेश करीत महाराज म्हणतात -

**नारायण भक्त देव नारायण । विश्वा अधिष्ठान नारायण ।।१३।।**
**नारायण शांति नारायण कांति । जिव्हा ओठ दंती नारायण ।।१४।।**
**नारायण तालू नारायण कंठ । स्थाने व्यापी अष्ट नारायण ।।१५।।**
**नारायण हे चतुराक्षरी ब्रह्म । ॐकार हे नाम एकाक्षरी ।।१६।।**
**नमस्कार मध्ये घालोनी करावे । चतुर्थी लावावे विभक्तीते ।।१७।।**
**'ॐ नमो नारायणायेति' मंत्र । स्मरावा पवित्र जीवे भावे ।।१८।।**
**देह कर्म करी, मन उपासना । जीव ब्रह्मज्ञानामाजी मिळे ।।१९।।**
**आता जे उरले उपकारासाठी । ते गुह्य शेवटी ज्ञानेश्वर ।।२०।।**[३२]

नारायण हाच भक्त आहे. नारायण हा देव आहे. नारायण हेच विश्वाचे अधिष्ठान आहे. नारायण हीच शांती, नारायण हीच कांती. जिभेवर नारायण असावा, दातावर नारायण असावा. तालुचे ठायी नारायण असावा, कंठाचे ठायी नारायण असावा, ओठाचे ठायी नारायण असावा - म्हणजेच जिव्हा,

कंठ, ओष्ठ, तालु, दंत या शब्दोच्चाराच्या सर्व स्थानी म्हणजेच पर्यायाने वर्णमालेतील प्रत्येक अक्षरात नारायण पहावा. याप्रमाणे सर्व स्थाने नारायणाने व्यापली आहेत. अष्टदिशा नारायणाने व्यापल्या आहेत. नारायण हे चार अक्षरी ब्रह्म आहे, तर 'ॐकार' हे एकाक्षरी ब्रह्म आहे. एकाक्षरी ब्रह्म प्रारंभी घ्यावे, मध्ये 'नमो' या शब्दाने नमस्कार घालावा आणि 'नारायण' या शब्दाला 'अय' हा चतुर्थीचा प्रत्यय लावला म्हणजे, 'ॐ नमो नारायणाय' हा मंत्र सिद्ध होतो. हा पवित्र मंत्र जीवेभावे स्मरला म्हणजे देहकर्म करीत राहातो आणि मन उपासना करीत राहाते. जीवाला ब्रह्मज्ञान होते. अशी चालतीबोलती समाधी प्राप्त झाली म्हणजेच जो उरतो तो उपकारासाठी हे गुह्य मला ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले.

ॐकार हेच सर्व मंत्रांचे बीज आहे. पण भक्तजनांसाठी गोविंदाचे नामस्मरण हेच सर्वमंत्राहून श्रेष्ठ आहे, असे प्रतिपादन करीत महाराज म्हणतात-

**सकलहि मंत्रा तेचि एक बीज । प्रणवाचे निज म्हणती श्रुति ।।१।।**
**तेचि भक्तासाठी साजिरे सगुण । आंगे गौरवर्ण प्रकाशले ।।२।।**
**माथां निशापति जटेत जान्हवी । वामांक शोभवी हिमबाळा ।।३।।**
**गोविंदनामाची अत्यंत आवडी । शिवनामी गोडी गोविंदाही ।।४।।**
**सोहंभावे दोन्ही होउनिया एक । आळंदीनायक ज्ञानेश्वर ।।५।।**[३३]

ॐकार हेच सर्व मंत्रांचे बीज आहे, असे श्रुतीने म्हटले आहे. पण भक्तांसाठी तेच कर्पूरगौर अशा सगुण साकार रूपात शिवशंकराच्या रूपाने प्रकटले आहे. ज्याच्या जटेमध्ये जह्नुची कन्या जाह्नवी गंगा असून ज्याच्या वामांकावर हिमवान पर्वताची कन्या पार्वती आहे. असा शिवशंकरही गोविंदाचे नाम घेतो आणि सोहंभावाने त्याच्याशी एकरूप होतो, असे ज्ञानेश्वर महाराज





म्हणतात.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनी उपासनेच्या अभंगातून 'ॐ नमो नारायणाय' हा अष्टाक्षरी मंत्र आणि 'ॐनमो भगवते वासुदेवाय' हा द्वादशाक्षरी मंत्र यांचा उपदेश केला आहे. हरिस्मरण हे सर्व साधनांहून श्रेष्ठ आहे, असे प्रतिपादन करीत सकाळचा ध्यानाभ्यास कसा करावा याचे मार्गदर्शन त्यांनी केले आहे. हे करीत असतानाच शिव-वैष्णव उपासनेचा समन्वय साधण्याचा प्रयत्नही त्यांनी केला आहे.

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या उपासनेच्या अभंगातच मानसपूजेच्या १३ अभंगांचा समावेश असून त्यात महाराज म्हणतात -

**मानसपूजेचे प्रथम आन्हिक । प्रार्थना सम्यक केली येथ ।।१।।**
**येथील नेणता पुढे नाही गति । होईल फजीती आनोपाये ।।२।।**
**जिंकुनीया मना करावी प्रार्थना । पुजावे चरणा तेव्हा मग ।।३।।**
**पुढे पादसेवा महात्म्यवर्णन । ऐकताचि मन ब्रह्म होय ।।४।।**
**ज्ञानेश्वरकृपे ज्ञानेश्वर गाऊं । तेणे सदा राहूं ब्रह्मानंदी ।।५।।**[३४]

मानसपूजेचे प्रथम आन्हिक अर्थात् प्रारंभ म्हणजे प्रार्थना. प्रार्थनाच जर जाणून घेतली नाही तर पुढील गती प्राप्त न होता फजिती मात्र होते. म्हणूनच मन जिंकावे आणि प्रार्थना करावी आणि मग पादसेवा करावी. असे केले म्हणजे चित्त परब्रह्माचे ठायी लीन होते. असा ब्रह्मानंदाचा लाभ ज्ञानेश्वरकृपेने ज्ञानेश्वरांचे नामस्मरण केल्याने होतो.

आपली उपासना 'ज्ञानेश्वर' या चार अक्षरी मंत्राचीच आहे. तोच माझा तरणोपाय आहे, हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**आदि-मध्य-अंती हा आधार एक । अक्षरे तारक चार मज ।।१।।**
**आणिकांचे मंत्र जाहले ठेंगणे । बांधले त्रिगुणे सिद्धादिकी ।।२।।**
**मंत्र मंत्रदाता मज दोन्ही एक । आन उपासक द्वैतबद्ध ।।३।।**
**ज्ञानदेव नाम ज्ञानदेव रूप । वेगळा संकल्प नाही नाही ।।४।।**[३५]

'ज्ञा - ने - श्व - र' हा चार अक्षरांचा मंत्र हाच माझा तारक मंत्र आहे. तोच या विश्वाच्या आदि-मध्य आणि अंताचा आधार आहे. इतर सर्व मंत्र आणि सिद्धजनांची साधने सत्त्व, रज, तम या तीन गुणांनी बांधली आहेत, पण माझा हा तारकमंत्र हा त्यापलिकडचा आहे. म्हणून इतर सर्व मंत्र त्याच्यापुढे ठेंगणे आहेत. अन्य सर्व उपासना द्वैताने बांधलेली आहे. पण माझा मंत्र आणि मंत्रदाता ही मात्र एकच आहे. ज्ञानदेव हेच नाम, ज्ञानदेव हे रूप, याहून वेगळा संकल्प माझ्या चित्तात नाही.

याप्रमाणे ज्ञानदेवाचे नामस्मरण हाच सर्वश्रेष्ठ मंत्र होय, असे महाराजांनी प्रतिपादन केले आहे. हे प्रतिपादन करताना उपासना ही त्रिगुणातीत आणि द्वैतापलिकडची असावी असे महाराजांनी सुचविले आहे.

**करुणापर अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील सातवे प्रकरण करुणापर अभंगाला वाहिलेले आहे. यामध्ये स्तुतिशतक आणि स्वतःच्या काव्याबद्दलचे उद्गार अशा दोन भागांचा समावेश आहे. याप्रमाणे यात २९९ ते ७६३ अशा ४६५ अभंगांचा समावेश करण्यात आला असून त्यात ६५३ ते ७६३ असे स्तुतिशतकाचे १११ अभंग व स्वतःच्या काव्याच्या उद्गाराबद्दलचे ७२० ते ७६३ असे ४४ अभंग समाविष्ट होतात. हे सर्व अभंग करुणापर अभंगांतच आहेत.



सर्व संतसज्जनांनी आपल्या रचनांमध्ये कारुण्यभावाचा समावेश केला आहे. कारुण्यभाव हा भक्ताच्या असहाय्यतेतून प्रकट होणारी अंतिम शरणागती दर्शविते. सर्व साधने करून थकल्यानंतरही भगवद्प्राप्ती न झालेला भक्त असहाय्य होऊन 'हे भगवंता, आता तूच एक त्राता आहेस!' अशी आळवणी करतो, तेव्हा कारुण्यभाव प्रकटतो. कारुण्यभाव हा भक्तिसाधनेच्या प्रगतीतील मोठा टप्पा समजला जातो. समर्थ रामदासांनीही आपल्या करुणाष्टकातून असा कारुण्यभाव व्यक्त करीत म्हटले आहे -

**जळत हृदय माझे जन्म कोट्यानुकोटी**
**मजवरी करुणेचा राघवा पूर लोटी ।**
**तळमळ निववीरे नाम राम कारुण्य सिंधु**
**षडरिपुं कुळ माझे तोडियाचा विरोधु ।**

अशाच प्रकारचा उत्कट करुणाभाव प्रज्ञाचक्षूंच्या अभंगातूनही दिसून येतो. महाराज म्हणतात-

**ऐसी व्हावी बुद्धि देवा । नित्य चरणाची सेवा ।।१।।**
**ऐसे व्हावे सदा मन । रूप कल्पी श्यामवर्ण ।।२।।**
**ऐसी गोडी लागो चित्ता । कळो श्रीहरीची सत्ता ।।३।।**
**ऐसा राहो अभिमान । दास म्हणो नारायण ।।४।।**
**ऐसे व्हावे आत्मस्थिति । साधे अकृत्रिम भक्ति ।।५।।**
**ऐसे व्हावे समाधान । गोपीप्रिया आलिंगन ।।६।।**
**ऐसी ज्ञानेश्वरकृपा । कृष्णी सौख्य मायबापा ।।७।।**[३६]

हे देवा ! माझ्याकडून नित्य तुझ्या चरणाची सेवा घडावी अशी बुद्धी मला दे. नित्य तुझा शामवर्ण माझ्या मनामध्ये साठून राहो. श्रीहरीची सत्ता सर्वत्र पहावी अशी गोडी मला लागू दे. मी नारायणाचा दास आहे, असाच

माझा अभिमान रहावा. अकृत्रिम भक्तीची आत्मस्थिती राहून गोपींना प्रिय असलेल्या श्रीकृष्णाला आलिंगन दिल्याच्या अवस्थेत मी नेहमी राहावे, अशी माझ्यावर ज्ञानेश्वरांनी कृपा करावी. श्रीकृष्ण हेच माझे सर्व सौख्य आहे.

माझ्याकडून कोणतीही साधना घडलेली नाही आणि परमेश्वर माझ्यावर कशी कृपा करील असा भाव व्यक्त करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**न ये मज वेद, न ये मज शास्त्र । पुराणादि तंत्र तेही नेणे ।।१।।**
**न ये राग रंग विद्या बहु फार । नाही बोलणार चातुर्याने ।।२।।**
**नेत्रही आंधळे, न कळती ग्रंथ । नाही म्यां महंत सेवियेले ।।३।।**
**ऐशावरी कोण्या गुणे होईल कृपा । गुरु मायबापा ज्ञानेश्वरा ।।४।।**[३७]

मला वेदांचे ज्ञान नाही, मला शास्त्राचे ज्ञान नाही, मला पुराणे माहित नाहीत. मला तंत्रविद्या येत नाही, चांगले व्याख्यान करणे मला येत नाही वा अन्य कोणतीही विद्या माझ्याजवळ नाही. शिवाय त्यातून डोळे आंधळे. त्यामुळे ग्रंथ वाचता येत नाहीत. माझ्याकडून संतसेवाही घडली नाही. अशा अवस्थेत हे ज्ञानेश्वरा, माझ्यावर तुझी कशी कृपा होईल?

अशा अवस्थेत मी तुला कसा भेटू? तुझ्यासाठी मी अस्वस्थ होत आहे. असा भाव व्यक्त करीत महाराज म्हणतात -

**कोठवरी अंत पाहसी केशवा । पळ माझ्या जीवा धीर नाही ।।१।।**
**नयन आंधळे सांपडेना वाट । हातेरू चोखट नाही कोणी ।।२।।**
**आता कवणाच्या पाहू मुखाकडे । आणिक नावडे तुजवीण ।।३।।**
**ज्ञानेश्वरताता पायातळी ठेवा । करवावी सेवा बलात्कारे ।।४।।**[३८]

मी असा आंधळा आहे, मला हात धरून नेईल असा कोणी मदतनीसही नाही आणि आता मी कुणाच्या तोंडाकडे पाहू ? तुझ्याशिवाय मला कोण





त्राता आहे ? माझा अंत तू किती पाहणार आहेस? मला आता क्षणभरही धीर धरवत नाही. हे ज्ञानेश्वरा, मला आपल्या चरणतळीचे स्थान देवून माझ्याकडून बळजबरीने सेवा घडवा.

याप्रमाणे अस्वस्थतेचा भाव व्यक्त करीत महाराजांनी आपला स्वीकार माउलीने करावा म्हणून विनवणी करीत म्हटले आहे -

**हेचि एक विनवणी । तुम्ही ऐकावी श्रवणी ।**
**महाराजा शारंगपाणी । रहा येवोनी हृदयी ।।१।।**
**आणिक नलगे मोक्ष मुक्ति । एक व्हावी तुझी भक्ति ।**
**नेणे मी प्रमाण युक्ति । पायी आसक्ति जडो या ।।२।।**
**तर्कशास्त्र आटाघाटी । काही लाभ नोहे पोटी ।**
**म्हणोनिया जगजेठी । गुणगोठी तुझिया ।।३।।**
**पूर्ण करुणासागरा । मायबापा ज्ञानेश्वरा ।**
**आता पुन्हा न अव्हेरा । अंगिकार केलिया ।।४।।**[३९]

हे परमेश्वरा! हे शारंगधरा! माझी एक विनवणी आपण ऐका. आपण माझ्या हृदयात वास करा. मला मोक्षमुक्ती नको, केवळ तुझी भक्ती हवी. मला प्रमाण आणि युक्ती नको, मला तुझ्या पायाची ओढ हवी. तर्कशास्त्राच्या वाटाघाटी करून मला काही लाभ होणार नाही. मला केवळ तुझेच गुणसंकीर्तन करू देत. हे मायबापा! हे ज्ञानेश्वरा! हे करुणासागरा! आता माझा स्वीकार करा. माझा अव्हेर करु नका.

आपली मानसिक अस्वस्थता प्रकट करीत महाराज म्हणतात,

**काय करू आता । सख्या आळंदीच्या नाथा ।।१।।**
**नाही कोणी बुझाविता । माझे मन चोजविता ।।२।।**

**जीव झाला कासावीस । दिशा वाटताती ओस ।।३।।**
**माझे माहेर सासर । तुम्ही इंद्रायणीश्वर ।।४।।**
**न कळे कोणते ते हित । तुम्हा ठाऊक उचित ।।५।।**
**प्रिया ज्ञानेश्वराताता । माझी सर्व तुम्हां चिंता ।।६।।**[४०]

हे ज्ञानेश्वरा! हे आळंदीच्या नाथा ! माझ्या मनाची आस शांत करणारा कोणी नाही. माझा जीव कासावीस झाला आहे. मला सर्व दिशा ओस वाटतात. माझे माहेर-सासर तुम्हीच आहात. हे इंद्रायणीश्वरा! माझे हित कशात आहे हे तुम्हालाच माहित. माझी चिंता तुम्हालाच ठाऊक. तेव्हा मला आपल्या चरणापाशी जागा द्या.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या करुणापर अभंगांत परमेश्वर भेटीची तसेच सद्गुरु भेटीची मानसिक अस्वस्थता स्पष्ट केली आहे. सर्व काही सोडून, सर्व साधने बाजूला करून ते ज्ञानेश्वरांना तसेच भगवंताला शरण जाण्यास उत्सुक आहेत.

याप्रमाणे करुणाभाव व्यक्त करून जन्माने प्राप्त झालेली असहाय्यता प्रकट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात,

**मला जन्म दिला वेदबाह्य कुळी । वाजवाया टाळी नामरंगे ।।१।।**
**वासनेचे कर्म, कल्पनेची पूजा । कदा नेणे दुजा प्रतिबंधू ।।२।।**
**नलगे गायत्री काळबंधे जप । साधे उलटे पाप नाही नामी ।।३।।**
**आळंदीवल्लभा साबडे गाईन । पाय मी लाहीन जित्या-मेल्या ।।४।।**[४१]

हे देवा! तू मला वेदबाह्य कुळात जन्म दिला आहे. मला केवळ तुझ्या नामस्मरणाचाच अधिकार आहे. वासनेच्या कर्मांनी बांधलेल्या मला कल्पनेनेच तुझी पूजा करण्याचा अधिकार आहे. मला गायत्री कळत नाही,



पण उलटसुलट जपाचे पापही त्यामुळे लागत नाही. नामस्मरणात कोणताही दोष नाही. हे आळंदीवल्लभा! मी आवडीने तुझेच गुणसंकीर्तन करीन. तुझे पाय हेच माझ्या जीवनमरणाचा आधार आहे.

याप्रमाणे, शूद्र कुळात जन्म घेतल्याचा फायदाच झाला. अशीच भूमिका महाराजांनी आपल्या अभंगातून मांडली आहे.

**भक्तिपर अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज नुसते भक्तिमार्गाचेच प्रवक्ते आहेत असे नाही, तर ते मधुराद्वैत भक्तिमार्ग संप्रदायाचे प्रवर्तक आहेत. महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील ८ वे प्रकरण भक्तिपर अभंगांचे असून यात ७६४ ते ९२७ अशा १६४ अभंगांचा समावेश होतो. यातच शुक-परीक्षित संवादाच्या ७९७ ते ९२७ अशा १३१ अभंगांचा समावेश होतो. या अभंगांतून भक्तिमार्गाच्या विविध अंगांचा साक्षात्कार आपल्याला घडतो.

भक्तिशिवाय सर्व काही व्यर्थ आहे हे अध्यात्मविद्येचे रहस्य स्पष्ट करीत महाराज म्हणतात-

**भक्तिसुखावीण नाकळे हा हरी । बहु ऋषिवरी सांगितले ।।१।।**
**श्रम जाया व्यास बोले भागवत । तेथे हाचि अर्थ निरूपिला ।।२।।**
**बहुतां ज्ञानिया ब्रह्मरूप स्फूर्ति । हरिगुणकीर्तीवीण नाही ।।३।।**
**कथेवीण जे कां कवितागायन । श्वानाचे रोदन तैसे भासे ।।४।।**
**नाही त्या गोष्टीचा काय रे उकल । आहे त्याचे बोल तेही खोटे ।।५।।**
**मग या शब्दाने काय विवरावे । वदनी स्मरावे ज्ञानेश्वरा ।।६।।**[४२]

ऋषीमुनींनी हेच सांगितले आहे की, भक्तिसुखाशिवाय परमेश्वराचे स्वरूप कळून येत नाही. व्यासांनी आपल्या भागवतात असेच प्रतिपादन केले

आहे. अनेक ज्ञानीजनांना परब्रह्माची स्फूर्ती हरिसंकीर्तनाशिवाय होत नाही. भगवंताच्या कथेशिवाय जे काही काव्यगायन केले जाते ते कुत्र्याच्या रडण्यापेक्षा महत्त्वाचे नाही. परमेश्वराचे स्वरूप हे शब्दांनी व्यक्त करता येण्यासारखे नाही. भक्तीनेच त्याचा साक्षात्कार घडू शकतो. म्हणून नेहमी सद्गुरू श्री. ज्ञानेश्वर महाराजांचे स्मरण करावे.

याच विभागात येणाऱ्या शुक-परीक्षित संवादातूनही भक्तीचे श्रेष्ठत्व वर्णन करण्यात आले आहे. महाराज म्हणतात -

**शुक म्हणे परीक्षिती । निस्त्रैगुण्य माझी स्थिती ।**
**नेणे पुरुष युवती । झालो चित्ती परि शांत ।।१।।**
**म्यां स्वर्ग लवंडिला । ब्रह्मलोक उणा केला ।**
**मोक्ष लाथे हाणितला । भये पळविला काम ।।२।।**
**झालो सच्चिदानंदघन । एवढा मी शक्तिमान ।**
**परी झालो आकर्षित । गोपीप्रेमे करोनी ।।३।।**[४३]

शुकाचार्य परिक्षितीला म्हणतात, माझी स्थिती त्रिगुणातीत आहे. स्त्री-पुरुष हा भेद माझ्यापाशी नाही. मी शांत झालो आहे. मी स्वर्गसुखाचा त्याग केला. मी ब्रह्मलोकही बाजूला सारला. मी मोक्षाला लाथ मारली आणि काम माझ्यापासून घाबरून पळून गेला. मी आता सच्चिदानंदघन असा शक्तिमान झालो आहे. तरी मी गोपींच्या प्रेमाने मात्र आकर्षित झालो आहे.

अद्वैत भक्तीचा भाव कसा असतो ते स्पष्ट करीत महाराज म्हणतात-

**अद्वैतीचे सुख जाणती सद्गुरु । जेणे अंगिकारू केला माझा ।।१।।**
**देव तोचि भक्त, भक्त तोचि देव । भिन्न मात्र नांव सुखासाठी ।।२।।**
**दूधरसमेळे रसदूध एक । प्रत्ययचि देख भिन्नमात्र ।।३।।**



**तैसा देव-भक्ती द्वैताचा प्रत्यय । प्रेम मात्र होय अद्वैताचा ।।४।।**
**ज्ञानेश्वरप्रभु द्वैतीच अद्वैत । आत्मरूपी चित्त विकासले ।।५।।**[४४]

सद्गुरू हाच अद्वैत अनुभूतीचे सुख जाणतो. त्याने माझा अंगीकार केला आहे. देव तोच भक्त आहे आणि भक्त तोच देव आहे. जे द्वैत आहे, ते केवळ सुखासाठी आहे. दूध आणि रस एकत्र मिळविले तर ते एकच होतात. फक्त ते नाममात्र भिन्न असतात. तसाच हा भक्तीतील द्वैताचा प्रत्यय आहे. प्रेमाची अंतिम स्थिती अद्वैत हीच आहे. ज्ञानेश्वर प्रभूच्या ठायी या द्वैतातले अद्वैत मी अनुभवले आहे.

ज्ञानोत्तर भक्ती हा भारतीय तत्त्वचिंतनातील एक वादग्रस्त मुद्दा आहे. पूज्यपाद शंकराचार्यांना ज्ञानोत्तर भक्ती मान्य नाही, असा एक विचार वेदांतात मांडला जातो. ज्ञानोत्तर भक्ती नाकारली तर ज्ञानोत्तर कर्मही नाकारले जाते. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी मात्र ज्ञानोत्तर भक्तीचा स्वीकार केला आहे. महाराज म्हणतात -

**तत्त्वमैक्य अनुभव । एक होवो ब्रह्मजीव ।।१।।**
**भगवन्माहात्म्यज्ञान । बुद्धि ओळखो संपूर्ण ।।२।।**[४५]

या अभंगात 'तत्त्वमसि' या छांदोग्य उपनिषदातील महावाक्याचा संदर्भ अभिप्रेत आहे. छांदोग्य उपनिषदात उद्दालक आरुणीने श्वेतकेतुला जो उपदेश केला आहे त्यात 'तत्त्वमसि' हे महावाक्य येते. यात तत् - त्वम् - असि अशी तीन पदे येतात. 'तत्' पदाने परब्रह्म अथवा परमेश्वर अभिप्रेत आहे. तर 'त्वं' पदाने जीव अभिप्रेत आहे. जीव आणि ब्रह्म ही तत्त्वे एकच आहेत, असे या महावाक्यात प्रतिपादन केले आहे. हाच भावार्थ वरील अभंगातून स्पष्ट करण्यात आला आहे. 'तत्त्वमसि' या महावाक्यानुसार जीव

ब्रह्माशी एकरूप व्हावा आणि भगवंताच्या नामाचे माहात्म्य बुद्धीने ओळखावे, अशी इच्छा महाराजांनी व्यक्त केली आहे.

'तत्त्वमसि' या महावाक्यातील तत् या पदाने ज्ञानाचा निर्देश होत असून 'त्वं' या पदाने भक्तीचा निर्देश होतो. असा अन्वयार्थ लावीत महाराज म्हणतात -

**कर्म उपासना । होय साधन विज्ञाना ।।१।।**
**तैसी नोहे हरिभक्ति । ज्ञानसम ईशप्रीति ।।२।।**
**ज्ञाने त्वंपद कळावे । प्रेमे तत्पदी मिळावे ।।३।।**
**कर्मोपास्ति कर्तृतंत्र । भक्ति नेणे अहंकार ।।४।।**
**ज्ञाने अपरोक्ष जीव । प्रेमे अपरोक्ष देव ।।५।।**
**ज्ञानी विवेकसाधन । प्रेमी चित्तमुद्राध्यान ।।६।।**
**ज्ञानेश्वरस्वामी माझा । बोले करुणे, ते बुझा ।।७।।**[४६]

कर्म आणि उपासना हे विज्ञानाचे साधन आहे. हरिभक्ती हे मात्र परमेश्वराच्या प्रीतीचे साधन आहे. ज्ञानाने त्वंपद कळून येते, तर प्रेमाने तत् पद कळून येते. कर्माची उपासना हे कर्तृत्वाचे तंत्र आहे. भक्तीला मात्र अहंकार कळत नाही. ज्ञानाने जीव तत्त्व समजून येते, तर प्रेमाने परमेश्वर समजून येतो. ज्ञानाचे साधन विवेक आहे तर प्रेमाचे साधन ध्यान आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी हे रहस्य माझ्यासाठी स्पष्ट केले.

याप्रमाणे ज्ञानोत्तर भक्ती हे महाराजांच्या भक्तिविवेचनाचे महत्त्वाचे लक्षण म्हणता येते. या संकल्पनेचा सविस्तर परामर्श डॉ. वा. ना. पंडित यांनी आपल्या 'शांकरवेदांतात भक्तीचे स्थान' या चिकित्सक प्रबंधात घेतला आहे. डॉ. पंडित[४७] म्हणतात, "ज्ञान्याच्या ज्ञानदशेचा विचार केल्यास





ज्ञान्याचे ठिकाणी जी वृत्तीरूप दशा असते ती, जल व तरंग किंवा साखर व त्याची गोडी किंवा सुवर्ण व अलंकार या दृष्टान्तानुसार परब्रह्माचे ठिकाणी दोनपणावाचून दोनपणाने भासणारी किंवा एकपणाला यत्किंचित् बाध न येता दोनपणाचा भास भासवणारी अशी असते. ही एवढी वृत्तिरूप दशाच ज्ञानोत्तर भक्तीला पुरेशी आहे. वृत्ती आणि ब्रह्म समसत्ताक म्हणजे सारख्या दोन सत्तेचे स्वतंत्र पदार्थ नसल्यामुळे अशा भक्तीत द्वैत राहू शकत नाही. द्वैत म्हणजे मागे सांगितल्याप्रमाणे दोन पदार्थ एकसारख्या सत्तेचे असणे होय."

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या भक्तिपर अभंगांतून अद्वैतभक्तीचा उत्कट आविष्कार झालेला दिसून येतो. माधुर्यभावाबरोबरच ज्ञानोत्तर भक्तीचा स्वीकार महाराजांनी केला असून हे त्यांच्या भक्तिमार्गाचे वैशिष्ट्य आहे.

**वेदांतपर अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज हे मधुराभक्तीचे प्रवर्तक असले तरी त्यांच्या भक्तिमार्गाचा आधार वेदांत हाच आहे. वेदांत म्हणजे वेदांचा अंत. अर्थात्, वेदांचा शेवटचा भाग. वैदिक संहितांचे मंत्र, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषदे असे स्थूल मानाने चार भाग केले जातात. यातील उपनिषदांमध्ये तत्त्वज्ञानपर चिंतन आले आहे. वेदांच्या शेवटच्या भागात हे तत्त्वज्ञान आले असल्यामुळे भारतीय तत्त्वज्ञानाला 'वेदांत' हेच नाव दिले जाते. वेगळ्या अर्थाने वेदामध्ये कर्म आहे. तर ज्ञानामध्ये कर्माचा अंत आहे. म्हणूनही उपनिषदे ही वेदांत ठरतात. पूज्यपाद आद्यशंकराचार्यांचे अद्वैत मत म्हणजेच वेदांत मत असे मत सर्वमान्य असले तरी रामानुजाचार्यांचे विशिष्टाद्वैत आणि मध्वाचार्यांचे द्वैत ही देखील वेदांत म्हणूनच ओळखली जातात. प्रज्ञाचक्षू मात्र पूज्यपाद शंकराचार्यांचे अनुसरण सर्वत्र करतात.

शांकरमताचे अनुसरण करीत महाराज म्हणतात -

**श्रुतीचा सिद्धांत उदय हृदयी । तेव्हा पडे ठायी समन्वय ।।१।।**
**विवर्तवादाची धरियेली कास । ब्रह्मज्ञानाने नाश अज्ञानाचा ।।२।।**
**येती-जाती वृत्ति, नाही आठवण । पांडित्य का मौन, सम झाले ।।३।।**
**ज्ञानेश्वरकन्या सद्‌गुरूची आशा । विज्ञानचि दिशामय झाले ।।४।।**[४८]

श्रुतीचा म्हणजेच उपनिषदांचा सिद्धांत अंतःकरणात उतरतो तेव्हाच समन्वयाचा साक्षात्कार यासाठी विवर्तवादाची कास धरावी लागते. विवर्त म्हणजे एखाद्या वस्तूच्या जागी दुसरीच वस्तू भासणे, जसे दोरीवर साप दिसणे. याप्रमाणे या जगतात सर्वत्र परब्रह्मच भरलेले आहे. पण आपण मात्र त्याला जगत् समजतो, हेच अज्ञान. या अज्ञानाचा ब्रह्मज्ञानाने नाश होतो. अशी अवस्था प्राप्त झाली म्हणजे चित्तवृत्ती येतात - जातात. त्याचे महत्त्व वाटत नाही. सद्‌गुरू श्री. ज्ञानेश्वरांच्या कृपेने माझे चित्त असे ज्ञानमय होऊन गेले आहे.

एक परब्रह्मच सर्वत्र भरलेले असून द्वैताची सर्व अनुभूती ही माया आहे, हे स्पष्ट करीत आचार्यांना अनुसरत महाराज म्हणतात -

**अनादि मायेचा सहज अध्यास । लोभ भय त्यास अनुकारी ।।१।।**
**अध्यासांतर्भावे अध्यासाच्या कोटी । उठताती पोटी चिदन्वये ।।२।।**
**सहज अध्यास अधिकारी ठेवा । वर्णाश्रमभावा शास्त्रसिद्धि ।।३।।**
**लोभा भय पुढे पतनाचे मूळ । यासाठी उज्वळ कर्म कीजे ।।४।।**[४९]

अनादि मायेचा ब्रह्मावर जो अध्यास झाला आहे त्यामुळे द्वैतानुभव येवून लोभ, भय इत्यादी विकार उत्पन्न होतात. हा अध्यास असला तरी तो चैतन्याच्या अन्वयानेच अनुभवास येतो. ह्या अध्यासाचे निराकरण होण्यासाठी



आपापला वर्ण आणि आश्रम यांना विहित असलेले कर्म करीत शास्त्र ज्ञान संपादन करावे.

याप्रमाणे महाराजांच्या वेदांतपर अभंगात श्रुतीला अनुसरत महावाक्याचा विचार झाला असून शांकरतत्त्वज्ञानाचे अनुसरण करण्यात आलेले आहे. महाराजांची तत्त्वज्ञानविषयक भूमिका पूज्यपाद आद्य शंकराचार्यांना अनुसरणारी आहे हेच यातून स्पष्ट होते.

**उपदेशपर अभंग:**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील दहावे प्रकरण उपदेशपर अभंगांचे असून यात १०४५ ते १३४४ अशा एकूण ३०० अभंगांचा समावेश आहे. यात हरिस्मरण, संसारात मुक्ती अनुभवणे, साधना कशी करावी? वेदांचा अधिकार, गुरुभक्ती, काम-क्रोधादि विकार, द्वैत-अद्वैत भक्ती, ज्ञानाची पहाट, वैराग्यादि साधने अशा विविध विषयांचा समावेश करण्यात आला आहे. यातच देवासच्या राजांना केलेल्या उपदेशाचे १३०६ ते १३४५ अशा ४० अभंगांचाही समावेश करण्यात आला आहे.

परमेश्वर प्राप्तीसाठी संसाराचा त्याग करून संन्यास घ्यावयाची गरज नाही, संसारात राहूनच हरिस्मरण करावे असा उपदेश जनसामान्यांना करीत महाराज म्हणतात -

**राहोनिया संवसारी । मुखे आठवावा हरी ।।१।।**
**सर्व करा कामधंदा । चित्ती भजावे गोविंदा ।।२।।**
**वंदा संतांचे चरण । आत्मरूपी लावा मन ।।३।।**
**मग ज्ञानेश्वर आई । स्वये उद्धरूनि नेई ।।४।।**[५०]

या संसारातच राहून श्रीहरीला आठवावे, आपापला कामधंदा करून

गोविंदाचे स्मरण करावे. संतांच्या संगतीत राहून आत्मस्वरूपाचे ध्यान करावे. असे केले म्हणजे ज्ञानेश्वर माउली भक्ताचा उद्धार करते.

वेदाचा अधिकार शूद्रांना नाही. तो फक्त ब्राह्मणांनाच आहे. हा वेद सर्वांसाठी खुला करावा असा ब्राह्मणांना उपदेश करीत महाराज म्हणतात -

**वेदांची अक्षरे म्हणावी ब्राह्मणी । वदूं नये वाणी शूद्रादिकी ।।१।।**
**वेदाचा जो अर्थ वैकुंठनायक । तेथ मोकळीक चहूंवर्णा ।।२।।**
**रस सांडुनिया शाखा धुंडाळणे । व्यर्थ कां पाळणे कष्ट बहु ।।३।।**
**कृपाळ ब्राह्मण म्हणताती वेद । इतरां गोविंद हातां देती ।।४।।**
**ब्राह्मणासी माझा सामान्य उपदेश । वेद हृषीकेश सम करा ।।५।।**[५१]

ब्राह्मणांनी वेद म्हणावे, शूद्रांना वेदाचा अधिकार नाही, मात्र वेदांचा अर्थ असलेला वैकुंठनायक श्रीहरी तो मात्र सर्व वर्णांना मोकळा आहे. श्रीहरी हाच वेदांचा रस आहे. रससेवन करावयाचे सोडून पाने मोजीत बसणे म्हणजे व्यर्थ परिश्रम घेणे होय. ब्राह्मण हे कृपाळुच म्हटले पाहिजे, कारण ते वेद म्हणण्याचे परिश्रम घेतात आणि जनसामान्यांच्या हाती मात्र गोविंदाचे नाम देतात. ब्राह्मणांना माझा असा उपदेश आहे की, श्रीहरी जसा सर्वांसाठी मोकळा आहे तसाच वेदही सर्वांसाठी मोकळाच करावा.

जगामध्ये शब्दज्ञान सांगणारे पुष्कळ आहेत. पण अनुभूती मात्र कोणाला दिसून येत नाही. हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**तोंडभरी ब्रह्मज्ञान । परी चित्ती अभिमान ।।१।।**
**नको ऐसियाचा संग । संतमिषे केवळ सोंग ।।२।।**[५२]

ज्यांच्या चित्तातला अहंकार जात नाही, मात्र ते तोंडाने ब्रह्मज्ञान



सांगत असतात अशा संतांचे सोंग घेणाऱ्या शब्दसम्राटांची संगती मला नको.

वर्णाश्रमाचा धर्म सर्वांनीच पाळावा, असा उपदेशही महाराजांनी अनेक ठिकाणी केला आहे. महाराज म्हणतात -

**बोधावीण शब्द न दाविती ब्रह्म । व्यर्थ निजकर्म सोडू नये ।।१।।**
**वर्णाश्रमधर्म पाळावे आवडी । हरि घडिघडी चिंतावा की ।।२।।**[५३]

जोवर आत्मबोध होत नाही तोवर शब्दामधून ब्रह्मज्ञान प्रकट होत नाही. वर्णाश्रम धर्म पाळावा म्हणजेच आपला वर्ण आणि आश्रम यानुसार विहित असलेले कर्म करीत जावे. आपले कर्म सोडू नये. कर्म करीत करीत हरिस्मरण करीत जावे.

तत्त्वज्ञानाच्या उपदेशाबरोबरच व्यावहारिक उपदेश करीत महाराज म्हणतात -

**उपाशी मरावे घरात राहोनि । न जावे आंगणी श्रीमंताच्या ।।१।।**
**मिळेल तयात मानावा संतोष । न करावा द्वेष दुसऱ्याचा ।।३।।**[५४]

साधकाने उपाशी मरावे पण श्रीमंताच्या दारी जाऊ नये. जे मिळेल त्यात संतोष मानून कोणाचाही द्वेष करू नये.

जोवर मन स्वच्छ होत नाही, तोवर सर्व कर्मे व्यर्थ होत. हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**बोलणे ते झाले फोल । प्रेम-ओल नसतां ।।१।।**
**साधने होती बंधने । नारायणे टाकितां ।।२।।**
**वृथा झाला आयुभार । शारंगधर रुसतां ।।३।।**
**ज्ञानेश्वरकन्या मनी । चक्रपाणि आठवी ।।४।।**[५५]

चित्तामध्ये प्रेमाची ओल नसेल तर सर्व बोलणे व्यर्थच ठरते. नारायणाचा समावेश नसेल तर सर्व साधने व्यर्थ ठरतात. परमेश्वरच जर आपल्यावर रुसला तर आयुष्याचा भाग व्यर्थच नाही का? परमेश्वर आहे तर सर्व काही आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरकन्येचा हाच उपदेश आहे की, श्रीहरी स्मरण करावे.

याप्रमाणे महाराजांनी उपदेशाच्या अभंगांतून साधकांना विविध विषयांवर उपदेश केलेला दिसून येतो. या उपदेशात साधकाच्या कल्याणाची कळकळ आहे. तशीच समाजव्यवस्थेची घडी टिकविण्याची धडपडही आहे. जे काही करावयाचे ते परंपरेच्या चौकटीत करावे. वेदांचा अव्हेर करू नये. वर्णाश्रम व्यवस्था मोडू नये, असा महाराजांचा उपदेश आहे.

**श्रीकृष्णलीला विषयीचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या श्रीकृष्णलीलाविषयीच्या अभंगात १३४६ ते १४०३ अशा ५९ अभंगांचा समावेश त्यांच्या अभंगांच्या गाथेमध्ये आहे. यातच १३८१ पासून १४०३ पर्यंतचे अभंग गोपालकाल्याचे अभंग आहेत. तसेच यात एका हिंदी अभंगाचाही समावेश आहे.

श्रीकृष्णलीला ही व्यासांपासून ते आजतागायत हजारो साधुसंतांच्या चिंतनाचा, मननाचा आणि प्रवचनाचा विषय राहिला आहे. कृष्ण कथा गायिली नाही असा एकही संत आढळून येणार नाही. महाराज हे मधुराद्वैताचे अनुसरण करणारे असल्यामुळे गोपींचे कृष्णप्रेम हा त्यांच्या आवडीचा विषय आहे. श्रीकृष्णाचे मुरलीवादन ऐकून गोपींची अवस्था कशी होते हे वर्णन करीत महाराज म्हणतात -



**वाजवितो कोण वेणू वृंदावनी । हृदयांदोलनी कुशल तो ।।१।।**
**आघवे सुटले लज्जेचे पल्लव । आंगी अष्ट भाव दाटलेती ।।२।।**
**स्थावर जंगमा सहज समाधि । ब्रह्ममय नादी एक झाले ।।३।।**
**तुम्ही आम्ही दोघी बोलताही गोठी । निघताती ओठी श्यामनामे ।।४।।**
**ज्ञानेश्वरकृपे संचित नंदाचे । खेळे आनंदाचे मूर्तिमय ।।५।।**[५६]

गोपी म्हणतात, वृंदावनामध्ये वेणू वाजविणारा हा कोण आहे, तो नक्कीच इतरांची हृदये हेलावून टाकण्यात कुशल असावा. त्याचे बासरीवादन ऐकून आम्हाला जनरीतीची लाज राहिली नाही. अंगात अष्टभाव दाटून आले. अवघ्या चराचराला सहज समाधी लागली आणि त्या बासरीच्या मधुर स्वराने सर्वकाही ब्रह्ममय झाले. एकमेकांशी बोलावे तर कृष्णनामाशिवाय दुसरे काही ओठातून निघतच नाही. कृष्णाची ही यमुनातीरीची रासक्रीडा मी ज्ञानेश्वरकृपेने पाहिली.

याप्रमाणे माधुर्यभक्तीचा श्रृंगारिक आविष्कार या अभंगातून दिसून येत असला तरी तत्त्वज्ञानाचा आधार मात्र त्यातही कायम राहिला आहे. महाराज म्हणतात -

**विद्वत्ता त्यागोनि घ्यावे बाळपण । निगमवचन ऐसे आहे ।।१।।**
**आत्म आविष्कार करू नये कदा । ब्रह्मसूत्रपदा पहावे की ।।२।।**
**मुक्तासी हा विधि बोलियला वेदे । प्रारब्धाचे छंदे वागावया ।।३।।**
**तेचि दाखवाया आपुलिया अंगे । झाला रमारंग नंदबाळ ।।४।।**
**शुद्धभाव व्हाया झाला सान तनु । लीलागुणे मनु शिशु केला ।।५।।**
**ज्ञानेश्वरकन्या श्रुतिसूत्रभाष्य । जाणोनि रहस्य स्पष्ट करी ।।६।।**[५७]

साधकाने विद्वत्ता अंगी असली तरी ती बाजूला ठेवून बाळपण धारण करावे असे शास्त्राचे वचन आहे. आपले खरे स्वरूप कधी स्वतः प्रकट करू

नये. ब्रह्मसूत्र पदांचा अभ्यास करावा. वेदाने मुक्त झालेल्या ज्ञानी पुरुषासाठी हाच आचरणाचा धर्म सांगितला आहे. प्रारब्धानुसार जगत राहावे अशी लीला करावयासाठीच नंदाचा बाळ जन्माला आला. चित्तशुद्धी व्हावी म्हणून बाळरूप धारण केले. हे ज्ञानेश्वरकन्येने लिहिलेले श्रुतीसूत्राचे रहस्य जाणून केलेले कृष्णलीलेचे स्पष्टीकरण आहे.

याप्रमाणे कृष्णलीलेच्या अभंगांतून महाराजांनी कृष्णलीलांचे वर्णन केले असले तरी त्याचबरोबर कृष्णलीलेतून श्रुती, स्मृती, पुराणोक्त धर्माचे रहस्य कसे समजून येते तेही स्पष्ट केले आहे.

**विरहिणी अभंग :**

भक्तिमार्गाच्या साधनेत विरह भाव अत्यंत महत्त्वाचा ठरतो. विशेषत: माधुर्यभक्ती जेव्हा परमेश्वराकडे आपले प्रेमास्पद या दृष्टीने पाहून त्यावर स्त्री भावाने प्रेम केले जाते तेव्हा हा विरह भाव अतिशय उत्कटतेने दिसून येतो. म्हणूनच 'विरहिणी' किंवा 'विराणी' अभंग प्रकार उत्कट विरहावस्थेचा निदर्शक ठरतो. प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील बारावे प्रकरण विरहिणींना वाहिलेले आहे. यात १४०४ ते १४५० अशा ४७ अभंगांचा समावेश होतो. यातच गोपीगीताचे १८ अभंग समाविष्ट आहेत.

आपले प्रेमास्पद श्रीकृष्ण अजून का दिसून येत नाहीत अशी भावना व्यक्त करीत महाराज म्हणतात -

**रडतां रडतां गुंजा झाले डोळे । न दिसे सांवळे आझोनियां ।।१।।**
**काय करूं आता शरण कोणा जाऊं । विश्वास हा ठेवूं कवणावरी ।।२।।**[५८]

श्रीकृष्णाचे सावळे रूप दिसावे म्हणून रडून रडून माझे डोळे लाल झाले आहेत. तरीही ते सावळे रूप दिसून येत नाही. आता मी काय करू?



कोणाला शरण जाऊ? अशी असहाय्य अवस्था महाराजांनी व्यक्त केली आहे.

भगवंताने मला एकटे सोडून दिले आहे. अशी भावना व्यक्त करीत महाराज म्हणतात -

**सोडोनि सदनी एकटी गोपाळा । राहणे गोकुळा योग्य नोहे ।।१।।**
**हात दिल्यावरी करणे निरास । उचित थोरास नाही नाही ।।२।।**[५९]

हे गोपाळा, आपल्या प्रेयसीला एकटे सोडून असे गोकुळात राहणे योग्य नाही. एकदा माझा हात धरल्यावर असे सोडून देणे तुझ्यासारख्या थोरामोठ्यांना चांगले दिसत नाही.

आपल्या प्रियकराची भेट न झाल्यामुळे निर्माण होणारी अस्वस्थता प्रकट करीत महाराज म्हणतात -

**माझ्या जीवाचे जीवन । श्यामतनु दयाघन ।।१।।**
**देवा पदरी धरोनि । कोणी आणा ग साजणी ।।२।।**
**मन झाले उतावेळ । पंचप्राणही व्याकुळ ।।३।।**
**सखे, हृदय कठीण । धीर धरत आझून ।।४।।**
**वाटे चंदन अनळ । सुमनाचे हार व्याळ ।।५।।**
**स्वामी आळंदीच्या नाथा । विनवीत कृपावंता ।।६।।**[६०]

आपल्या जीवाचा सखा शामरंग दयाघन श्रीकृष्ण भेटावा म्हणून भक्त आपल्या सख्यांकडे आर्त भावाने विनवणी करीत आहे. मन उतावीळ झालेले आहे. पंचप्राण व्याकूळ आहे, चंदनाची शीतलता ही अग्निसारखी भासत आहे, तर फुलांचे हार काट्यासारखे वाटत आहेत. म्हणून हे आळंदीनाथा मला लवकर कृष्णभेट घडवा.

यांप्रमाणे विरहिणीच्या अभंगात महाराजांनी आपल्या प्रासादिक शैलीत विरहाचा भाव उत्कटपणे प्रकट केला आहे.

**प्रणयकलहाचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील १३ वे प्रकरण प्रणयकलहाच्या अभंगांचे असून यात १४५१ ते १४८२ अशा एकूण ३२ अभंगांचा समावेश करण्यात आला आहे. आपला प्रियकर श्रीकृष्ण याच्याशी प्रेमाने भांडण मांडलेले या अभंगांतून दिसून येते. महाराज म्हणतात-

**नाही तुज देवा मागितली सिद्धि । नाही म्या समाधि इच्छिली गा ।।१।।**
**नाही तुज काही घातले साकडे । का दुसऱ्याकडे लोटितोसी ।।२।।**[६१]

महाराज देवाला म्हणतात, हे देवा! मी तुझ्याकडे काहीच मागितले नाही. मी तुला सिद्धी मागितली नाही की समाधी मागितली नाही. मी तुला कोणते साकडेही घातले नाही. असे असताना मला तू का दूर लोटतोस?

त्याचप्रमाणे परमेश्वराशी भांडण उभे करीत महाराज म्हणतात,

**लाज न ये तुज मोठे म्हणविता । दीनासी अनंता उपेक्षिसी ।।१।।**
**लावितोसी लोकां आपुल्या भजनी । बससी भोजनी मंदिरात ।।२।।**[६२]

महाराज परमेश्वराला म्हणतात, हे परमेश्वरा! माझ्यासारख्या दीनजनांना तू दूर लोटतोस आणि स्वतःला मोठे म्हणवून घेतोस. याची तुला लाज वाटत नाही का? इतरांना नादी लावतोस आणि स्वतः जेवत बसतोस हे देखील तुला शोभत नाही.

परमेश्वराने आपल्याला स्वीकारावे म्हणून महाराज म्हणतात -



**प्रियेसी छळावे ब्रीद तुमचे की । छळीली जानकी रामजन्मी ।।२।।**
**कृष्ण-अवतारी सोळाही सहस्त्र । अनाथ साचार केल्या देवा ।।३।।**
**इये अवतारी दुःखित मी एक । निर्दय नायक मिळोनिया ।।४।।**[६३]

हे भगवंता! आपल्या प्रेयसीला छळावे हेच व्रत तुम्ही घेतले आहे का? रामजन्मात सीतेला वनवासात नेऊन तुम्ही छळले. कृष्ण जन्मात सोळासहस्त्र नारी करून सर्वांना छळले, त्या अनाथच राहिल्या. या युगात मी एक तुझ्या प्रेयसीच्या रूपाने तुझ्यासारखा निर्दय प्रियकर मिळाला म्हणून दुःखी आहे.

यांप्रमाणे एखाद्या प्रेयसीने आपल्या प्रियकराशी लटके भांडण मांडावे तसे भांडण महाराजांनी प्रणयकलहाच्या अभंगात आपले प्रेमास्पद भगवान श्रीकृष्ण यांच्याशी मांडले आहे.

**पौराणिक लीला - अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील चौदावे प्रकरण पौराणिक लीलांचे निरूपण करणारे आहे. यामध्ये १४८३ ते १४९५ असे फक्त १३ अभंग आले आहेत. यात प्रामुख्याने श्रीकृष्णाचे बालहट्ट आणि प्रभू रामचंद्राच्या लीला यांचे निरूपण आले आहे.

कृष्णाच्या बालहट्टाच्या अभंगात महाराज म्हणतात,

**सूर्यबिंब देई हो काहाडोन । म्हणोनिया घे भूमिये लोळण ।।१।।**
**माय म्हणे हे काय रे बोलसी । सूर्यबिंब हे न ये हाती त्यासी ।।२।।**[६४]

श्रीकृष्ण लहानपणी आपल्या आईला म्हणतो की, मला सूर्यबिंब काढून खेळावयास दे. श्रीकृष्णाच्या अशा बालहट्टाचे वर्णन त्यांनी प्रासादिक

शैलीत केले आहे.

प्रभू रामचंद्रांच्या लीला वर्णन करीत महाराज म्हणतात,

**सर्वसुखगोडी सांपडली हाता । नेत्री रघुनाथा देखियेले ।।१।।**
**सर्व काळ आज झाला अनुकूळ । देखिला हा बाळ कौसल्येचा ।।२।।**
**ध्यानमिषे पुढे आला नारायण । ब्रह्मज्ञान गौण करूनिया ।।३।।**
**ज्ञानेश्वर रूपे वसिष्ठाची कृपा । तेणे झाला सोपा नामरूपी ।।४।।**[६५]

प्रभुरामचंद्राचे रूप पाहिले तेव्हा सर्व सुख मला सापडले. कौसल्यात्मज श्रीरामाला पाहून आज सर्वकाळ मला अनुकूल झाला. ब्रह्मज्ञानाला गौण ठरवून हे सगुणरूप माझ्यापुढे आले ही ज्ञानेश्वर रूपाने वसिष्ठांचीच कृपा झाली असे म्हणावे वाटते.

याप्रमाणे, महाराजांनी आपल्या पौराणिक लीलांच्या अभंगात भगवान श्रीकृष्ण व प्रभुरामचंद्र यांच्या सगुण रूपाचे प्रासादिक वर्णन केले आहे.

**योगसाधनेचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील पंधरावे प्रकरण योगसाधनेच्या अभंगांचे आहे. यात १४९६ ते १५११ असे १६ अभंग समाविष्ट होतात. या अभंगांतून योगाच्या भूमिका, बावन्न योगिनी, साधन चतुष्टय, षट्चक्र निरूपण, अनाहत नाद, नादबिंदू आणि कला, इडा-पिंगला आणि सुषुम्ना असे योगशास्त्र विषयक विविध विषय आलेले दिसतात. तथापि योगाचे अंतिम गंतव्य हे महाराजांचे आराध्य दैवत असलेले भगवान श्रीकृष्ण हेच आहेत. महाराज म्हणतात -

**सकळ सुखांचे फिटलें पारणे । कृष्णा झाले येणे गोकुळासी ।।१।।**
**मन बुद्धि श्रोत्रादि पांच इंद्रिये । हरिरूपीं ठाये गिंवसिला ।।२।।**[६६]





योगसाधनेची परिपूर्ती मन, बुद्धी आणि सर्व इंद्रिये हरिचरणाचे ठायी अर्पण होताच होते. अशी अवस्था झाली म्हणजे सर्व सुख प्राप्त होते आणि चित्त कृष्णरूप होऊन जाते.

याप्रमाणे अत्यंत कमी शब्दांत योगाचे सर्व विषय महाराजांनी योगविषयक अभंगांतून हाताळले आहेत. याचे सविस्तर विवेचन प्रस्तुत प्रबंधात योगसाधनाविषयक अभंगांच्या प्रकरणात स्वतंत्रपणे करण्यात आले आहे.

**रूपकात्मक अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील रूपकपर अभंगाच्या प्रकरणात १५१२ ते १५१९ असे केवळ ८ अभंग आले आहेत. या अभंगात महाराजांनी आपल्या प्रासादिक भाषेत आपली आध्यात्मिक अनुभूती प्रकट केली आहे.

विश्वातील काही अघटित घटनांचे वर्णन करीत महाराज म्हणतात-

**डोळियाचे ठायी दृष्टादृश्यपण । प्रमाता प्रमाण प्रमेय की ।।१।।**
**वांझेचिया सुते पिकविले शेत । पाषाणा निश्चित चारिले ते ।।२।।**
**गगनाच्या फुले पूजिला झोटिंग । चढविला रंग अंधःकारा ।।३।।**
**सशाचिया श्रृंगे झोडियली भ्रांति । एकी हेळा शांति एणाइली ।।४।।**
**संसार परमार्थ तैसे हे सकळ । बंधमोक्षफळ कल्पित की ।।५।।**[६७]

संसार आणि परमार्थ, बंध आणि मोक्ष, या सर्व संकल्पना म्हणजे कल्पनेचा खेळ आहे. जसे वांझेच्या मुलाने शेतात पीक पिकवावे आणि ते दगडाला खाऊ घालावे अथवा आकाशाची फुले तोडून झोटींगाची पूजा करावी अथवा अंधाराला रंग द्यावे तसेच हे आहे. सशाचे शिंग हातात घेऊन भ्रांती नष्ट करावी आणि शांती प्राप्त करावी हे देखील असेच. तात्पर्य हेच की,

दृष्टा आणि दृश्य, प्रमाण आणि प्रमेय ही सर्व भ्रांतीच आहे. सर्वत्र एकमेवाद्वितीय परब्रह्म भरलेले आहे.

**आख्यान संग्रहाचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील सतरावे प्रकरण आख्यान संग्रहाच्या अभंगांचे असून त्यात १५२० ते २०१३ अशा ४९४ अभंगांचा समावेश होतो. यात वेगवेगळे १९ विषय आलेले आहेत.

पूतनामोक्षाच्या प्रकरणात १५२० ते १५४९ असे ३० अभंग आले आहेत. यात पूतना मावशीच्या प्रसंगाचे प्रासादिक वर्णन आले आहे. महाराज म्हणतात -

**पूतनेचा गंध गोकुळ न माय । जेथ हरि पाय क्रीडले हो ।।१।।**
**सकळ विलासा जे का अधिष्ठान । तो हरि सगुण क्रीडलासे ।।२।।**[६८]

कंसाने पाठविलेली पूतना ही श्रीकृष्णाचा वध करावयास आली होती. यशोदेचा मुलगा कोणत्या घरी आहे हे नक्की माहित नसल्यामुळे ती दिसेल त्या मुलाला मारत चालली. यशोदेच्या घरी आल्यावर कृष्णाने तिचा सहज लीलया वध केला. जो भेटावयास अत्यंत दुर्लभ आहे असा परमेश्वर सगुण रूपाने पूतनेच्या अंगावर खेळला. पूतना पवित्र झाली आणि पूतनेचा गंध गोकुळात मावेनासा झाला.

कृष्णतुलेच्या प्रकरणात १५५० ते १५९२ असे ४३ अभंग आहेत. सत्यभामेने आपल्या पतीचे म्हणजे श्रीकृष्णाचे दान नारदाला दिले आणि कृष्ण परत मिळविण्यासाठी त्याची तुला करून त्याच्या वजनाचे सोने नारदाला दान द्यायचे कबूल केले. श्रीकृष्णाची तुला झाली. सत्यभामेच्या घरचे सगळे सोने आणून पारड्यात घातले पण तुला काही झाली नाही. तेव्हा तुळशीचे





पान टाकले आणि पारडे जड झाले. या कथेचे सार मांडत महाराज म्हणतात -

**नारद बोलती मिथ्या हे सुवर्ण । तुळशीचे पर्ण सत्य यात ।।११।।**
**तेचि आता आम्ही घेतो उचलोनि । अनर्थाची खाणी सोने न्यावे ।।१२।।**[६९]

तुळशीचे पान टाकल्यावर पारडे जड झालेले पाहून नारद म्हणाले, या पारड्यातले सोने मिथ्या आहे आणि तुळशीचे पान मात्र सत्य आहे. मी तेवढेच घेऊन जातो. बाकीचे तुम्ही ठेवून घ्या.

पुण्यधामाच्या प्रकरणात १५९३ ते १६३१ असे ३९ अभंग आहेत. यातच गंगापंचपदीच्या १६१७ ते १६२१ अशा पाच अभंगांचा समावेश आहे. दोन ब्राह्मण काशीयात्रेला गेले. जाताना वाटेने भगवंताचे नामस्मरण न करता संत सज्जनांची निंदा करीत ते गेले. तेथे गेल्यावर त्यांना भागीरथीचे दर्शन झाले नाही. अशी कथा या प्रकरणात आहे. याचे सार मांडत महाराज म्हणतात-

**देवनिंदा होता रक्षिताति संत । न रक्षी भगवंत सन्निंदका ।।८।।**[७०]

देवाची निंदा केली तर संत रक्षण करतात पण संतांची निंदा केली तर मात्र देव रक्षण करत नाही.

**मंडुकांचा जन्म दुष्कर्माचे फळ । म्हणोनि गंगाजळ नुद्धरी त्या ।।११।।**[७१]

संतांची निंदा करण्याचे पाप बेडकाचा जन्म देते आणि जन्मभर गंगाजळात राहूनही त्याचा उद्धार होत नाही.

चिंधीच्या कथेत १६३२ ते १६६६ अशा ३५ अभंगांचा समावेश आहे. एकदा भगवान श्रीकृष्णाचे बोट कापले तेव्हा पट्टी बांधायसाठी सुभद्रा घरभर चिंधी शोधत राहिली, पण तिला फाटके कापड सापडेना. द्रोपदीने मात्र पितांबर

फाडून पट्टी बांधावयास दिली. ही घटना वर्णन करीत महाराज म्हणतात -

**याज्ञसेनी म्हणे प्रभु ब्रह्मसुता । कैसे कृष्णनाथा झाले माझ्या ।।१।।**
**जगाची माउली भूमिये पडली । चिंधी मागितली दुबळीस ।।२।।**
**जगाचिया वस्त्रा काय पांघरूण । देते मी काढून देहत्त्वाचा ।।३।।**
**ऐसे म्हणोनियां पडली भूवरी । दृढ ज्ञानेश्वरी प्रेम तीचा ।।४।।**[७२]

द्रौपदी नारदाला म्हणते कृष्णाचे बोट असे कसे काय कापले? ती जगाची माउली, जमीनीवर पडली आणि माझ्यासारख्या दुबळीला चिंधी मागितली. आता काय करावे? जे जगाचे वस्त्र त्या परमेश्वराला पांघरूण घालावे कसे? मी माझ्या देहाची त्वचाच काढून देते. तात्पर्य हेच की, जोवर देहबुद्धी जात नाही, तोवर परमेश्वर प्राप्त होत नाही.

पार्थ भिल्लीणीच्या अभंगांत १६६७ ते १६८१ अशा २५ अभंगांचा समावेश आहे. मृत्तिका भक्षणाच्या प्रकरणात १६८२ ते १६९९ अशा १८ अभंगांचा समावेश होतो. गोपिनौकाविहाराच्या प्रकरणात १७०० ते १७२८ अशा २९ अभंगांचा समावेश आहे. निळ्या नारींच्या प्रकरणात १७२९ ते १७५३ अशा २५ अभंगांचा समावेश आहे. बिल्वमंगलाच्या प्रकरणात १७५४ ते १७६६ अशा १३ अभंगांचा समावेश आहे. सुरथ सुधन्वाच्या प्रकरणात १७६७ ते १८१२ अशा ४६ अभंगांचा समावेश आहे. कर्माबाईच्या वात्सल्य भक्तीच्या प्रकरणात १८१३ ते १८४८ अशा ३६ अभंगांचा समावेश आहे. अजापालाच्या प्रकरणात १८४९ ते १८७२ अशा २४ अभंगांचा समावेश आहे. शुकगणिकेच्या प्रकरणात १८७३ ते १८९६ अशा २४ अभंगांचा समावेश आहे. रंतिदेवाच्या प्रकरणात १८९७ ते १९०१ अशा ५ अभंगांचा समावेश आहे. कुशिष्याच्या प्रकरणात १९०२ ते १९१६ अशा १५ अभंगांचा समावेश आहे. उपमन्यूच्या प्रकरणात १९१७ ते १९६१ अशा ४५ अभंगांचा समावेश





आहे. नारायणदासाच्या प्रकरणात १९६२ ते १९९१ अशा ३० अभंगांचा समावेश आहे. विमला-सुशिला प्रकरणात १९९२ ते २००८ अशा १७ अभंगांचा समावेश आहे. पार्थ गर्वहरणाच्या प्रकरणात २००९ ते २०१३ अशा ५ अभंगांचा समावेश आहे.

याप्रमाणे विविध आख्यानांच्या अभंगांतून महाराजांनी आपले तत्त्वज्ञान मांडले आहे. जगातील सर्व सुखाहून आणि साधनाहून हरिभक्ती हीच श्रेष्ठ आहे हे महाराजांच्या प्रतिपादनाचे सूत्र या आख्यानांतून कायम असलेले दिसते.

**प्रभातीचे अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील १८ वे प्रकरण हे प्रभातीच्या अभंगांचे आहे. यात २०१४ ते २०१७ असे फक्त ४ अभंग असून यात महाराजांनी भगवंताला भूपाळीने उठविले आहे. या अभंगातून पहाटेचे सुंदर वर्णन करीत महाराज म्हणतात -

**स्वामी सूर्योदय झाला । निशाकर अस्ता गेला ।।१।।**
**पूर्वदिशा उजळली । भूमि प्रभामय झाली ।।२।।**
**विप्र करोनिया स्नान । मंत्रे देती अर्घ्यदान ।।३।।**
**तुम्हा आधी ते ब्राह्मण । करिताति संध्या स्नान ।।४।।**
**घेवोनिया गंगाजळ । द्वारी उभे द्वारपाळ ।।५।।**
**आम्ही ज्ञानेश्वरबाळा । अंगिकारा मेघनीळा ।।६।।**[७३]

हे भगवंता! निशापती चंद्र अस्ताला जाऊन सूर्योदय झाला आहे. पूर्व दिशा उजळून या पृथ्वीवर सर्वत्र प्रकाश पसरला आहे. ब्राह्मण मंडळी स्नान करून अर्घ्यदान देत आहेत. द्वारपाळ हातात गंगाजळ घेऊन उभे आहेत.

आता आपणही उठून आपल्या चरणांचे दर्शन या ज्ञानेश्वरकन्येला द्या.

याप्रमाणे प्रभातीच्या अभंगात प्रासादिक भूपाळ्यांची रचना महाराजांनी केली आहे.

**संकीर्ण अभंग :**

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील १९ वे प्रकरण संकीर्ण अभंगांचे असून यात २०१८ ते २०३८ अशा २१ अभंगांचा समावेश आहे. या अभंगात विविध विषयांचा समावेश झालेला दिसून येतो. आपण शूद्र वंशात जन्माला आलो आणि संस्कृताचे पारंपरिक अध्ययन केलेले नाही याची खंत व्यक्त करीत महाराज म्हणतात -

**नाही म्यां देखिले वैदिक ब्राह्मण । येतील कोठून श्रुति मग ।।१।।**
**नेणे मी पैंगल नेणे पाणिनीय । कोठूनिया काव्य शोभा देई ।।२।।**
**नेणे मी अप्सरा गांधर्विक स्वर्ग । कैसे मज राग वळतील ।।३।।**
**म्हणोनिया सभेमध्ये बैसावया । अधिकार ठाया न मी योग्य ।।४।।**[७४]

महाराज म्हणतात, मला वैदिक ब्राह्मण पहावयासही मिळाले नाही मग श्रुतीचे ज्ञान मला कसे होणार? मी कधी पाणिनीच्या व्याकरणाचा वा पिंगलाच्या छंदशास्त्राचा अभ्यास केला नाही. मग माझ्या हातून काव्यरचना कशी होणार? मी कधी गंधर्व पाहिले नाहीत, अप्सरा पाहिल्या नाहीत, मग मला रागगायन मला कसे येणार? आणि म्हणूनच विद्वानांच्या सभेस बसावयाची माझी लायकी नाही.

परमेश्वराचे ज्ञान तर्काच्या सहाय्याने होऊ शकत नाही हे प्रतिपादन करीत संकीर्ण अभंगात महाराज म्हणतात -





**शुष्कतर्क जाले हारपतो प्रेम । भासती निगम मूढबुद्धि ।।२।।**
**तर्कवादियांचे नवल आक्षेप । माय आणि बाप अप्रमाण ।।३।।**[७५]

शुष्कतर्काचा आश्रय घेतला तर भक्तिभाव लयाला जातो आणि मग वेदशास्त्रे म्हणजेच मूर्खांचे प्रतिपादन आहे असे वाटू लागते. तर्कवाद्यांचे आक्षेप असे आश्चर्यकारक असतात की, ते मायबाप सुद्धा प्रमाणाने सिद्ध करतात आणि अप्रमाण मानतात.

केवळ एका भक्तिमार्गानेच परमेश्वराचे आकलन होते असे प्रतिपादन करीत महाराज म्हणतात-

**भावबळे आकळे नारायण । रामकृष्ण हे करी पारायण ।**
**होई चित्ती चैतन्यपरायण । पाहूनिया निजसत्त्व सारायण ।।२।।**[७६]

परमेश्वराची प्राप्ती केवळ भक्तिभावानेच होते म्हणून 'रामकृष्ण हरी' या मंत्राचे पारायण करावे. आत्मस्वरूपाची ओळख पटवून चित्तात चैतन्य साठवले म्हणजे परमेश्वर भेटतो.

यात्रमाणे विविध विषयांचा परामर्श घेण्यात आला असून परमेश्वर हा भक्तीनेच साध्य होतो हा सिद्धांत प्रतिपादन करण्यात आला आहे.

याशिवाय २०३९ ते २०४९ असे ११ अभंग महाराजांच्या स्व-चरित्राच्या वर्णनाचे आहेत. आपल्या चरित्रातील काही ठळक बाबी त्यांनी या अभंगातून नोंदविल्या आहेत.

**जनन ते माझे कुणबिया उदरी । परदेसी परी झाले माय ।।१।।**
**नाही प्यालो पुरे जननीचे दुध । पाजिल प्रसिद्ध अजापय ।।२।।**

**तान्हेपणी झाले आंधळे नयन । कष्ट जाणं-येणं करणे प्राप्त ।।३।।**
**तीन वरुर्षात निवर्तली माता । नाही सांभाळीता योग्य कोणी ।।४।।**[७७]

माझा जन्म कुणब्याच्या पोटी झाला. लहानपणीच आई गेली. त्यामुळे आईचे दूध पुरेसे पिता आले नाही. बकरीच्या दुधावर माझे संगोपन झाले. लहानपणीच डोळे गेले. अशा या अवस्थेत मला सांभाळणारा कोणी नव्हता.

अशाप्रकारे आपल्या चरित्र्याचे संक्षिप्त कथानक महाराजांनी स्व-चरित्रवर्णनात मांडले आहे.

यानंतर स्तुतिसंग्रहाचे २०५५ ते २०६८ असे १४ अभंग असून त्यात शिवशंकर, नर्मदा, हनुमान, हरिहर, नृसिंह आणि ज्ञानेश्वर अशा विविध देवतांची आणि गीतेचीही स्तुती केली आहे.

**गीते ऐसे शास्त्र नाही त्रिभुवनी । थोर वेदाहूनि मज वाटे ।।१।।**
**वेद तो केवळ स्वप्नीचा उच्छ्वास । जागृतीत त्यास मान नाही ।।२।।**[७८]

गीतेसारखे शास्त्र जगात शोधूनही सापडणार नाही, मला तर ते वेदाहूनही मोठे वाटते. वेद हा स्वप्नावस्थेतल्या अनुभूतिसारखा आहे; तर गीता ही भगवंतांनी जागृतीच सांगितली आहे.

स्तुतिसंग्रहातच गंगापंचरत्नाचे अभंग आहेत. यात गंगेची स्तुती आली आहे. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील शेवटचे प्रकरण नव्या अभंगांचे आहे. यात २१०० ते २१५८ असे ५९ अभंग आलेले आहेत. यातही विविध विषयांचा समावेश झालेला आहे. या अभंगाचा प्रारंभ गुरूपरंपरेच्या चिंतनाने होतो. महाराज म्हणतात -



**सकळ सज्जना साष्टांग प्रणाम । होवोनि निष्काम करी पाहे ।।१।।**
**आदिनाथ गुरु मच्छेंद्र माउली । गोरक्ष साउली कृपातरू ।।२।।**
**गयनि ते माय निवृत्ति तो तात । माझा ज्ञाननाथ मायबाप ।।३।।**[७९]

सर्व सज्जनांना माझा साष्टांग प्रणाम असो. मी निष्काम भावनेने त्यांना नमस्कार करतो. आदिनाथ - मच्छेंद्रनाथ, गोरक्षनाथ, गहिनीनाथ, निवृत्तिनाथ आणि ज्ञाननाथ ही माझी गुरूपरंपरा आहे. याप्रमाणे आपल्या गुरूपरंपरेला वंदन करून या अभंगांतून विविध विषयांचे प्रतिपादन महाराजांनी केले आहे. तथापि, हरिस्मरण हाच मुक्तिचा एकमेव उपाय आहे म्हणून नामस्मरण करावे हेच स्पष्ट करीत महाराज म्हणतांत -

**रामकृष्ण हरि रामकृष्ण हरि । मंत्र षडाक्षरी जपा सदा ।।१।।**
**राम तो ॐकार कृष्ण परब्रह्म । स्वयें हरिनाम प्रत्ययो हा ।।२।।**
**वेदांचे हे बीज सहा ही अक्षरें । उपनिषदिं बारे निरूपिलें ।।३।।**[८०]

'रामकृष्णहरी' या सहा अक्षरी मंत्राचा जप नेहमी करावा. राम हा ॐकार आहे. कृष्ण हे परब्रह्म आहे तर, हरी हे आत्मस्वरूप आहे. ही सहा अक्षरे हे वेदांचे सार असून तेच उपनिषदांचे रहस्य आहे.

याप्रमाणे नव्या अभंगांतून महाराजांनी गुरुस्मरण, वेदांत, कृष्णलीला, नामस्मरण असे विविध विषयनिरूपण केले आहेत.

वरील प्रतिपादनावरून प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील अभंगाच्या वर्गीकरणाविषयी खालील निष्कर्ष मांडता येतात.

१. मंगलाचरणाच्या अभंगात परंपरा बाळगूनही गणेशादि देवतांच्या वंदनाबरोबरच प्रत्येक ठिकाणी ज्ञानेश्वर माउली आणि श्रीकृष्ण

स्मरण यांचा सातत्याने उल्लेख महाराजांनी केला आहे.

२. सगुण ध्यानाच्या अभंगात प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनी प्रामुख्याने ज्ञानेश्वर माउली आणि भगवान श्रीकृष्ण यांचे ध्यान केले असले तरी, त्याचबरोबर भगवान श्रीरामचंद्र, भगवान श्री. नरसिंह आणि भगवान श्री. शिवशंकर यांचेही ध्यान केले आहे. सगुण ध्यानाचा हा मार्ग वेदांतातील अन्वयव्यतिरेकाचा साक्षात्कार घडवून मायेच्या बंधनातून मुक्त करणारा आहे.

३. नामस्मरणाच्या विविध अभंगांतून प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनी नामस्मरणाचा मार्ग चारही वर्णांना खुला असल्याचे स्पष्ट करून त्याचे आचरण करणे अत्यंत सोपे आहे. नामस्मरण हेच भवसागर तरून जाण्याचा एकमेव मार्ग आहे. तेच चारही वेदांचे सार आहे. नामस्मरणाचा हा महिमा भगवान वेदव्यासांनी भागवतात वर्णन केला आहे. प्रज्ञाचक्षूंनी ज्ञानेश्वर कृपेने हा नामस्मरण योगच साधन म्हणून अवलंबिलेला आहे.

४. महाराजांनी आपल्या संतसंगतीच्या अभंगांतून संतमहिमा वर्णन केला आहे. महाराजांच्या दृष्टीने देवता प्रसन्न झाल्याने होणाऱ्या लाभाहून संतमहिमा महत्त्वाचा आहे. देवकृपेने सिद्धी प्राप्त झाल्या तरी अहंकार बळावतो, मात्र संतमहिम्याने काम-क्रोधादि विकारांचा उपशम होऊन साधक परमावस्थेची वाटचाल करू लागतो.

५. सद्‌गुरु महिम्याच्या आपल्या अभंगांतून महाराजांनी गुरुमहिमा अत्यंत भावपूर्ण शब्दांत वर्णन केला आहे. महाराजांच्या दृष्टीने गुरुकृपेशिवाय सर्व शास्त्रे, सर्व साधना, सर्व उपासना व्यर्थ होत. सद्‌गुरुचरण हेच सर्व सुखांचे निधान आहे.





६. ज्ञानदेवाचे नामस्मरण हाच सर्वश्रेष्ठ मंत्र होय, असे महाराजांनी प्रतिपादन केले आहे. हे प्रतिपादन करताना उपासना ही त्रिगुणातीत आणि द्वैतापलीकडची असावी असे महाराजांनी सुचविले आहे.

७. शूद्र कुळात जन्म घेतल्याचा फायदाच झाला, अशीच भूमिका महाराजांनी आपल्या अभंगांतून मांडली आहे.

८. प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या भक्तिपर अभंगातून अद्वैतभक्तीचा उत्कट आविष्कार झालेला दिसून येतो. माधुर्यभावाबरोबरच ज्ञानोत्तर भक्तीचा स्वीकार महाराजांनी केला असून हे त्यांच्या भक्तिमार्गाचे वैशिष्ट्य आहे.

९. महाराजांच्या वेदांतपर अभंगात श्रुतीला अनुसरत महावाक्याचा विचार झाला असून शांकर- तत्त्वज्ञानाचे अनुसरण करण्यात आलेले आहे. महाराजांची तत्त्वज्ञानविषयक भूमिका पूज्यपाद आद्य शंकराचार्यांना अनुसरणारी आहे हेच यातून स्पष्ट होते.

१०. महाराजांनी उपदेशाच्या अभंगांतून साधकांना विविध विषयांवर उपदेश केलेला दिसून येतो. या उपदेशात साधकाच्या कल्याणाची कळकळ आहे. तशीच समाजव्यवस्थेची घडी टिकविण्याची धडपडही आहे. जे काही करावयाचे ते परंपरेच्या चौकटीत करावे. वेदांचा अव्हेर करू नये. वर्णाश्रम व्यवस्था मोडू नये. असा महाराजांचा उपदेश आहे.

११. कृष्णलीलेच्या अभंगांतून महाराजांनी कृष्णलीलांचे वर्णन केले असले तरी त्याचबरोबर कृष्णलीलेतून श्रुती, स्मृती, पुराणोक्त धर्माचे रहस्य कसे समजून येते तेही स्पष्ट केले आहे.

१२. विरहिणीच्या अभंगांत महाराजांनी आपल्या प्रासादिक शैलीत विरहाचा भाव उत्कटपणे प्रकट केला आहे.

१३. एखाद्या प्रेयसीने आपल्या प्रियकराशी लटके भांडण मांडावे तसे भांडण महाराजांनी प्रणयकलहाच्या अभंगांत आपले प्रेमास्पद भगवान श्रीकृष्ण यांच्याशी मांडले आहे.

१४. महाराजांनी आपल्या पौराणिक लीलांच्या अभंगांत भगवान श्रीकृष्ण व प्रभुरामचंद्र यांच्या सगुण रूपाचे प्रासादिक वर्णन केले आहे.

१५. अत्यंत कमी शब्दांत योगाचे सर्व विषय महाराजांनी योगविषयक अभंगांतून हाताळले आहेत. याचे सविस्तर विवेचन प्रस्तुत प्रबंधात योगसाधनाविषयक अभंगाच्या प्रकरणात स्वतंत्रपणे करण्यात आले आहे.

१६. विविध आख्यानांच्या अभंगांतून महाराजांनी आपले तत्त्वज्ञान मांडले आहे. जगातील सर्व सुखाहून आणि साधनाहून हरिभक्ती हीच श्रेष्ठ आहे हे महाराजांच्या प्रतिपादनाचे सूत्र या आख्यानांतून कायम असलेले दिसते.

१७. प्रभातीच्या अभंगात प्रासादिक भूपाळ्यांची रचना महाराजांनी केली आहे.

१८. संकीर्ण अभंगांच्या प्रकरणात विविध विषयांचा परामर्श घेण्यात आला असून परमेश्वर हा भक्तीनेच साध्य होतो हा सिद्धांत प्रतिपादन करण्यात आला आहे.

१९. आपल्या चारित्र्याचे संक्षिप्त कथानक महाराजांनी स्व-चरित्रवर्णनात





मांडले आहे.

२०. नव्या अभंगांतून महाराजांनी गुरुस्मरण, वेदांत, कृष्णलीला, नामस्मरण असे विविध विषय निरूपण केले आहेत.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांच्या अभंगांच्या गाथेतील अभंगांच्या वर्गीकरणावरून असे दिसते की, महाराजांनी आपल्या अभंगातून भारतीय तत्त्वज्ञान, योगसाधना, भक्तिमार्ग, नामस्मरण, पौराणिक आख्याने, श्रीकृष्णलीला, सद्गुरू स्मरण अशा विविध आध्यात्मिक अंगांना स्पर्श केला आहे. या सर्व अभंगांतून महाराजांची तत्त्वचिंतनाची मूलगामी दृष्टी प्रतीत होते. शांकर वेदांताचा नवा अन्वयार्थ अनध्यस्त विवर्ताच्या संकल्पनेने महाराजांनी अभंगातून मांडला आहे. तर, माधुर्यभक्तीच्या प्रवर्तनाने भक्तिमार्गाचा नवा आविष्कार प्रकट केला आहे. या सर्व अभंगांतून विद्वत्ता आणि तर्क यापेक्षा गुरुकृपा आणि अनुभूती महत्त्वाची आहे हे सूत्र महाराजांनी कायम ठेवले आहे.

* * * * * *

# गुलाबराव महाराजांचे भक्तिपर अभंग

सनातन भारतीय धर्माने मानवी जीवनाचे उद्दिष्ट म्हणून धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष अशा चार उद्दिष्टांचा उल्लेख केला आहे. ही चार उद्दिष्टे सर्वच दार्शनिकांना मान्य आहेत. यापैकी चौथे म्हणजे मोक्ष हे उद्दिष्ट जीवनाचे अंतिम उद्दिष्ट मानले जाते. मोक्ष अथवा निर्वाण याचा अर्थ जीवाची जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून सुटका असा सामान्यपणे केला जातो. हा अर्थ वैदिक आणि अवैदिक अशा सर्वच मतप्रणालींना मान्य आहे. सनातन वैदिक - पौराणिक परंपरेनुसार मोक्ष म्हणजे ईश्वरप्राप्ती असाही अर्थ करता येईल. ईश्वर प्राप्तीचे जे सर्वमान्य मार्ग भारतीय परंपरेला मान्य आहेत त्यात ज्ञान मार्ग, कर्ममार्ग, योगमार्ग व भक्तिमार्ग असे चार मार्ग महत्त्वाचे मानले जातात. यातही ज्ञान, कर्म व योग हे तीन मार्ग कठीण समजल्या जाऊन भक्तिमार्ग हा सर्वात सोपा मार्ग आहे असे म्हटले जाते.

भक्ती हे एकमेव असे साधन आहे की, जे सर्वजण सहजतेने करू शकतात आणि त्यावर मनुष्यमात्राचा अधिकार आहे. या कलियुगात तर आत्मोद्धारासाठी भक्तीसारखा दुसरा कोणताच सोपा मार्ग नाही. कारण सांप्रत स्थितीत ज्ञान, योग, तप, त्याग वगैरे फलद्रूप होणे कठीण आहे. शिवाय त्यासाठी लागणारी साधनसामुग्री मिळणेही अवघड आहे. म्हणून माणसाने कंबर कसून फक्त ईश्वर भक्तिचेच साधन करण्यास तत्पर असावयास हवे. विचाराअंती असे दिसते की, जगात धर्माला अनुसरणारे जितके लोक आहेत, त्यांतील बहुसंख्य लोक ईश्वरभक्तीच पसंत करतात. आता आपण विचार करावयास हवा की, हा ईश्वर कोण आहे ? आणि त्याची भक्ती म्हणजे काय ? जो





सर्वांवर शासन करतो, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वान्तर्यामी आहे, न्याय आणि सदाचारच ज्याचा कायदा आहे, जो सर्वसाक्षी असून सर्वांना शिक्षा, बुद्धी आणि ज्ञान देणारा आहे आणि तिन्ही गुणांपासून अलिप्त असूनही केवळ लीलेने गुणभोक्ता आहे, ज्याची भक्ती केल्याने मनुष्य सगळे दुर्गुण, दुराचार आणि दुःखांपासून मुक्त होऊन परम पवित्र होतो, जो अव्यक्त असूनही जीवमात्रांवर दया करून जीवांचे कल्याण आणि धर्माचा प्रचार करण्यासाठी व भक्तांना आश्रय देण्यासाठी आपल्या लीलेद्वारा वेळोवेळी देव, मनुष्य वगैरे सर्व रूपांत व्यक्त होतो, म्हणजेच साकार रूपात प्रत्यक्ष प्रगट होऊन भक्तजनांना त्यांच्या इच्छेनुरूप दर्शन देऊन आनंदित करतो आणि जो सत्ययुगात श्रीहरीच्या रूपात, त्रेतायुगात श्रीरामाच्या रूपात, द्वापरयुगात श्रीकृष्णाच्या रूपात प्रगट झाला होता, अशा प्रेममय अविनाशी विज्ञानानन्दघन सर्वव्यापी हरीसच ईश्वर समजावयास हवे.

गुलाबराव महाराजांच्या अभंगाची गाथेतील तसे पाहता सर्वच अभंग भक्तिपर आहेत. किंबहुना अभंगरचना ही भक्तिपरच असते. ज्ञानेश्वर महाराजांपासून ते तुकारामबुवांपर्यंतच्या ईश्वरनिष्ठांच्या मांदियाळीने रचलेले सर्व अभंग हे भक्तिपरच आहेत. गुलाबराव महाराज हे देखील यास अपवाद नाहीत. भक्तिचा उत्कट आविष्कार महाराजांच्या अभंगातून दिसून येतो. भक्तिशिवाय परमेश्वर कळून येत नाही हे स्पष्ट करीत प्रारंभीच महाराज म्हणतात -

**भक्तिसुखावीण नाकळे हा हरी । बहु ऋषिवरी सांगितले ।।१।।**
**श्रम जाया व्यास बोले भागवत । तेथे हाचि अर्थ निरूपिला ।।२।।**
**बहुतां ज्ञानिया ब्रह्मरूप स्फूर्ति । हरिगुणकीर्तीवीण नाही ।।३।।**
**कथेवीण जे कां कवितागायन । श्वानाचे रोदन तैसे भासे ।।४।।**[८१]

याप्रमाणे चित्ताची एकाग्रता साधण्यासाठी योग अथवा कर्म या अवघड मार्गापेक्षा भक्तिमार्गच सुकर आहे असा महाराजांचा दृढनिश्चय आहे.

**वैदिक परंपरा आणि भक्तिमार्ग :**

भक्तिमार्गाचा उदय साधारणपणे मध्ययुगात झाला असे म्हटले जाते. 'ज्ञानदेवे रचिला पाया। तुका झालासे कळस।।' या उक्तीत वारकरी संप्रदायाचा प्रारंभ आणि विकास कसा होत गेला याचे सुतोवाच असले तरीही त्याचबरोबर भक्तिपंथाचा विकास कसाकसा होत गेला याचाही निर्देश अप्रत्यक्षपणे होतो. कारण, 'वारकरी संप्रदाय म्हणजेच भक्तिमार्ग' असे समीकरण सर्वमान्य झाले आहे. याविषयी भक्तिमार्ग वैदिकच असल्याचे प्रतिपादन करीत श्री. रा.गो. कोलंगडे म्हणतात, "तथापि, भक्तिमार्गाची पाळेमुळे वैदिक परंपरेत आढळतात. भक्तिमार्ग वैदिक आहे किंवा नाही याविषयी मतमतांतरे दिसून येत असली तरीही भक्तिमार्ग हे वैदिक परंपरेचेच अपत्य आहे यात शंका नाही."[८२]

महाराष्ट्रातील भक्तिमार्गाचा विचार करताना आणखी एका महत्त्वाच्या प्रश्नाची चिकित्सा करणे आवश्यक आहे. भक्तिविचार हा वैदिक आर्यांच्या धर्मकल्पनेचेच विकसित रूप आहे काय? हा तो प्रश्न होय. आपल्याकडील सर्वच धार्मिक-सांस्कृतिक कल्पनांचा उगम वैदिक आर्यांच्या धर्मात दाखविण्याची एक परंपरा आहे. या परंपरेला अनुसरून भक्तिविचार हा वैदिक धर्माचाच विकास आहे, याविषयी भक्तिवेदांत प्रभुपाद यांनी म्हटले आहे, "आर्यांचा यज्ञ हाच पुढे भगवद्गीतेत नामयज्ञ, जपयज्ञ यांच्या रूपाने अवतरत असल्याने यज्ञसंस्कृतीचे परिपक्व, मधुर फळ म्हणजे भागवतधर्मातील भक्तिविचार होय."[८३]



याविषयी डॉ. स.रा. गाडगीळ यांनी आपले मत खालीलप्रमाणे नोंदविले आहे, "स्थूल यज्ञापेक्षा यज्ञातील सूक्ष्मतत्त्वाला प्राधान्य देणारा आणि संपूर्ण मानवी जीवनच यज्ञमय करणारा भागवतधर्म हा वैदिक धर्माचेच तेजस्वी, उन्नत, उदात्त, परिणत आणि भव्य स्वरूप आहे हे लक्षात येईल आणि 'निगमकल्पतरोर्गलितं फलम्' भागवत धर्म हे वेदांच्या कल्पवृक्षाचे परिपक्व व मधुर फळ आहे हे प्रसिद्ध रूपक जितके सुंदर तितकेच अर्थपूर्णही आहे याविषयी संदेह राहणार नाही."[८४]

मध्ययुगामध्ये नव्याने पुनरुज्जीवित झालेला भक्तिविचार हा मूलतः सामाजिक आणि सांस्कृतिक परिवर्तनाचाच आविष्कार आहे. दक्षिणेकडील अळवार संत रामानुज, मध्वाचार्य, ज्ञानेश्वर, रामानंद, कबीर, दादू, नरसी मेहता आदी संतांनी पुरस्कारिलेली भक्तिची चळवळ प्रारंभी तरी सामाजिक आणि सांस्कृतिक दास्यातून स्त्री-शूद्रांची मुक्तता घडवून आणण्याच्या प्रेरणेमधूनच फोफावली. परंतु, ही सर्व चळवळ धर्माच्या कक्षेतच वावरत होती, असे मत डॉ. गाडगीळांनी नोंदविले आहे.

भागवत धर्माच्या उगमाचा शोध करीत वेदवाङ्मयापर्यंत जावे लागते. वेदोक्त धर्म ऋताच्या महान् ध्येयवादाने प्रेरित झाला आहे. विश्व आणि मानव यांच्या परस्परपूरक विकासाशी संवादी असलेला धर्म ऋत रूपाने वेदांनी सांगितला आहे. वैदिक ऋताच्या प्रकाशात भागवत धर्माचा अभ्यास केला असताना ऋतप्रेरणा वेदोत्तरकालीन सत्य, यज्ञकर्म, ब्रह्म या पात्रातून प्रवास करीत भागवत धर्मातील भग, विष्णू आणि निष्काम कर्मयोग यात परिणत झाली आहे हे स्पष्ट होते. भक्तिमार्गाचा आद्य प्रवर्तक 'भगवान' श्रीकृष्ण हा विष्णू या देवतेचा अवतार मानला जातो. विष्णू ही ऋग्वेदातील देवता आहे. शिवाय 'भगवान्' या विशेषणामधील 'भग' हीही ऋग्वेदातील आदित्य देवता

आहे. तेव्हा भागवत अथवा वैष्णव धर्माचा ऋग्वेदाशी अतूट संबंध आहे असाही एक प्रबल युक्तिवाद करण्यात येतो.

ऋग्वेदातील इंद्र-सूक्तांमध्ये भक्तिचा आविष्कार झाला आहे. 'देवळाजवळील भक्ताची सलगी, दोघांचे परस्पर जीवाभावाचे सख्य, भक्तासाठी वाट्टेल ते रूप घेण्याची देवाची तयारी, आपल्या जवळ असेल नसेल ते दोन दोन हातांनी भक्तांना देण्याचे औदार्य, .. भक्ताची अनन्य शरणागती व आत्मनिवेदन... या सर्व गोष्टी ऋग्वेदसूक्तांत विशेषत: इंद्रसूक्तांत त्याचप्रमाणे नामदेव, तुकाराम इत्यादी संतभक्तांच्या अभंगसूक्तांत सारख्याच आढळून येतात.' वरुण आणि इंद्र यांच्याकडे पाहण्याचा सूक्तकाराच्या दृष्टिकोनाचा तुलनात्मक विचार करताना ते म्हणतात, 'वरुणाच्या मोठेपणाचे म्हणजे जगाच्या धारण-पोषणासंबंधीचेही उल्लेख वरुणसूक्तांत नेहमी येतात, परंतु त्याच्या लडिवाळपणाचे, मोकळेपणाचे त्यात नावही नसते... इंद्राकडे पाहण्याची कवीची दृष्टी व वरुणाकडे पाहण्याची दृष्टी यात जमीन-आस्मानाचे अंतर आहे. वरुणाबद्दल कवीच्या मनात आदर आहे, भीती आहे, परंतु प्रेमाचा, अनुरक्तीचा, लडिवाळपणाचा एक थेंबही आहे असे वाटत नाही... आणि म्हणून आम्हा भारतीय आर्यांच्या कल्पनेतील परमोच्च भक्तिचा प्रादुर्भाव व विकास त्या म्हणजे वरुण देवतेच्या भक्ताच्या मनात होऊ शकला नाही. जो प्रादुर्भाव व विकास झाला तो इंद्रभक्तांच्या मनातच झाला.'

वैदिक ऋर्षींच्या प्रतिभेला स्फुरलेला 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' हा एकेश्वरवादी विचार उपनिषदांमध्ये 'सर्वं खलु इदं ब्रह्म' या विचारात परिणत झाला. परंतु उपनिषदातील या ब्रह्मविचारात भावनेला फारसा अवकाश नसल्याने येथेही भक्तीला आधार मिळू शकला नाही. ऋग्वेदोत्तरकाळात वैदिक ऋषींच्या विचारविश्वात प्रचंड वादळे सुरू झाली होती. यज्ञ-मंत्रांच्या यात्वात्मक





प्रभावातून ऋषी बाहेर पडू लागले होते, त्यांच्या 'देवता' विषयक कल्पनांना नवा आकार येत होता. यज्ञसंस्कृतीविरुद्ध उपनिषदांनीच बंडखोर विचार व्यक्त करण्यास प्रारंभ केल्याबरोबर नवे धर्मपंथ उदयाला येऊ लागले, यज्ञसंस्कृतीच्या प्रभावामुळे मागे पडलेल्या स्थानिक लोकसमाजाच्या देवता आता संस्कृति-समन्वयाच्या प्रक्रियेतून सर्वमान्य होऊ लागल्या, वैदिक आर्यांच्या यज्ञाचा संपूर्ण कायापालट झाला, केवळ 'यज्ञ' हा शब्द मागे राहिला, पण त्याचा आशय संपूर्ण बदलून गेला. ऋग्वेदामध्ये महत्त्व पावलेल्या इंद्र, वरुण, अग्नी, इ. देवता लुप्त होऊन अगदी गौण स्वरूपाच्या विष्णूला महत्त्व आले. विष्णूच यज्ञरूप बनला. या सर्व सांस्कृतिक घडामोडींमधून एक नवाच उपासनामार्ग सिद्ध झाला. हाच 'भक्तिमार्ग' होय. ऋग्वेदातील यात्वात्मक यज्ञविधीपासून एकेश्वरी भक्तिमार्गापर्यंत भारतीय धर्मविचाराचा जो विकास झाला त्याचे ऐतिहासिक दृष्टिकोनातून अवलोकन करणे उद्‌बोधक ठरणारे आहे.

**नारायणीय धर्म :**

वैदिक परंपरेत दोन मार्ग प्रामुख्याने आढळून येतात. एक सांख्यांचा आणि दुसरा योगाचा. ही भूमिका गीतेत खालीलप्रमाणे मांडण्यात आली आहे.

**लोकेऽस्मिन् द्विविधानिष्ठापुराप्रोक्तामयानघ ।**
**ज्ञानयोगेनसांख्यानाम् कर्मयोगेनयोगीनाम् ।।**[८५]

अर्थात्, या लोकात दोन प्रकारच्या निष्ठा असल्याचे मी स्पष्ट केले आहे. एक निष्ठा सांख्यांची असून ती ज्ञानयोग म्हणून ओळखली जाते तर दुसरी निष्ठा कर्माची असून ती 'योग' म्हणून ओळखली जाते. या वैदिक

निष्ठेत 'योग' या शब्दाने कर्मकांड अभिप्रेत होते. वैदिक कर्मकांड म्हणजेच यज्ञ आणि त्याची प्रक्रिया ही अत्यंत क्लिष्ट व जटिल होती. तसेच यज्ञात हिंसा देखील मोठ्या प्रमाणावर होत असे. उदा. अश्वमेधासारख्या यज्ञात हजाराहून जास्त पशू बळी दिले जात असत. यामुळे यज्ञाहून सोपा व साधा असा परमेश्वरी उपासनेचा मार्ग शोधण्याच्या उद्योगात भारतीय प्रज्ञा होती. उपनिषदांनी कर्ममार्गाहून ज्ञानमार्ग श्रेष्ठ असल्याचे वेळोवेळी प्रतिपादन केले. हे लक्षात घेता उपनिषदे ही वेदांत म्हणजे 'वेदांचा शेवटचा भाग याबरोबरच वेदाचा म्हणजे कर्मकांडाचा अंत' या अर्थानेही वेदांत ठरतात.

मुंडक उपनिषदात याविषयी आलेला उल्लेख लक्षात घेण्यासारखा आहे. येथे म्हटले आहे, "प्लवाह्येतेअदृढायज्ञरूपा' यज्ञ या भवसागर तरून जाण्यास निरुपयोगी अशा फुटक्या नौका आहेत."[८६] यासारखी उद्धरणे उपनिषदातून देता येतील. यातूनच पुढे नैतिक भक्तिमार्गाचा विकास होत गेला. गीतेने यज्ञाचे द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, जपयज्ञ, ज्ञानयज्ञ असे विविध प्रकार वर्णन केले आहेत.

भक्तिमार्गाचे आद्यस्वरूप नारायणीय सात्वत धर्मात प्रगट झाले असले तरी त्याचा उद्‌गम वैदिक परंपरेमधून व यज्ञाच्या संकल्पेतूनच झाला आहे. नारायण ऋषीच्या नावाने उपलब्ध असलेल्या पुरुषसूक्तामध्ये यज्ञ हाच मध्यवर्ती विचार असून हा यज्ञ अत्यंत व्यापक आहे. वैदिक यज्ञ आणि पुरुषसूक्ताचा प्रवर्तक नारायण ऋषी यांच्यामधील हा दुवा भगवद्‌गीतेमधील भक्तिमार्गाला जे नवे स्वरूप प्राप्त झाले त्या दृष्टीनेही सांस्कृतिक समन्वय महत्त्वाचा आहे. प्रारंभीच्या वैदिक धर्मावर पुरुषसूक्त, महाभारत, भगवद्‌गीता, विष्णुपुराण, भागवत या ग्रंथांतून नवेनवे संस्कार होऊन भागवतधर्म अथवा भक्तिमार्ग विकसित झाला. यातील काही संस्कार वैदिक तत्त्वज्ञानातून





झालेले आहेत तर काही तांत्रिकांच्या आचार-विचारांमधून झाले आहेत. तंत्र हा वैदिक परंपरेचाच भाग आहे.

भगवद्‌गीतेमध्ये प्रथम या मार्गाला तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान देण्यात आले. वैदिकांचा यज्ञ, सांख्यांचा स्वभाववाद, ज्ञानमार्ग व तज्जन्य यतिमुनी संप्रदायाचा योग व निवृत्तिमार्ग सर्वसमर्थ अशा ईश्वराविषयी कान्तिक भक्ती आणि शेवटी कालोचित असा लोकसंग्रहपर कर्ममार्ग या सर्वांचे एक अपूर्व रसायन तयार करून महाभारताने विशेषत: भगवद्‌गीतेने या नव्या धर्माचा पुरस्कार केला. यादवांचा सांस्कृतिक नेता श्रीकृष्ण हा या नव्या धर्माचा प्रणेता बनला. महाभारतातील नारायणीय आख्यान, भगवद्‌गीता, विष्णुपुराण, भागवत या विविध भागवतधर्मीय प्रमाणग्रंथांच्या द्वारा भक्तिमार्गाचा विकास कसा होत गेला आणि मध्ययुगात ज्ञानेश्वरांच्या काळी त्याला कोणते स्वरूप प्राप्त झाले होते हे यापुढे पहावयाचे आहे. भागवतधर्माचा प्रणेता श्रीकृष्ण हा विष्णूचा अवतार असून विष्णू ही वैदिक आर्यांची देवताच आहे आणि शेवटी भागवतधर्माचा विकास भग या वैदिक देवतेपासून भग - सविता - सूर्य - विष्णू - कृष्ण याच क्रमाने झाला आहे असे स्पष्ट होते. या संदर्भात वैदिक धर्म आणि भक्तिमार्ग यांच्या संबंधात एक सरळ शृंखला आहे असे दिसून येते.

प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान आणि साधनामार्ग हा नारायणीय धर्माच्या परंपरेतीलच आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. ज्ञानेश्वरांना अनुसरून नारायणीय परंपरेतील श्रीकृष्णभक्तिचे आर्त महाराजांच्या अभंगातून प्रकटले आहे. किंबहुना मधुराभक्ती म्हटली की, ती कृष्णभक्तिच असू शकते. माधुर्य भूमिका घेऊन श्रीरामाची अथवा हनुमंताची भक्ती करता येणार नाही. कारण या दैवतांची प्रकृती तशी नाही. भक्ती

कोणत्या प्रकारे करावी हे जसे भक्ताच्या प्रकृतीवर अवलंबून असते तसेच ते दैवताच्या प्रकृतीवरही अवलंबून असते. श्रीराम हा एकपत्नीव्रत आचरण करणारा आहे आणि हनुमंत हा ब्रह्मचारी आहे. त्यामुळे त्याची भक्ती पत्नीभावाने वा सखीभावाने करणे अशक्य आहे. कृष्णभक्तिचा हा भाव खालील अभंगातून उत्कटपणे प्रकट झालेला दिसून येतो.

**कळले तूं नाही यशोदानंदन । अंतर चेतन सदानंदी ।।१।।**
**सागरी तरंग जैसे न्यूनावती । तैसे देह होती तुजमाजी ।।२।।**
**तरंग हे विश्व गौप्यचि करूनी । सिंधु चक्रपाणी गंगा झाला ।।३।।**
**म्हणोनिया व्रजी आलासी धावत । उच्छिष्ट जेवीत गोपींचे तूं ।।४।।**
**तुझे गोड पाणी त्यात आम्ही नारी । संगमी साचारी नद्या मिळू ।।५।।**
**तुमचा आमुचा होताचि संगम । भावना परम सिंधु येथे ।।६।।**
**मग हे गोकुळ विश्वात पवित्र । सुवर्णालंकार सोन्यासीचि ।।७।।**[८७]

याप्रमाणे कृष्णचरित्राचे वातावरण महाराजांच्या अभंगात स्पष्टपणे दिसून येते.

### श्रीमद्‌भगवद्‌गीता - भागवत - श्रीकृष्ण आणि भक्तिमार्ग :

भक्तिमार्ग हा नारायणीय पांचरात्र सात्वतधर्माचा एक भाग आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. भक्तिमार्गाच्या साधनेत कृष्ण या दैवताचे, त्याचे चरित्र ज्या ग्रंथात सांगितले आहे त्या भागवत महापुराणाचे आणि खुद्द भगवंताचेच वचन असलेल्या श्रीमद्‌भगवद्‌गीतेचे महत्त्व अनन्यसाधारण असे आहे. भक्तिमार्गाचे वैष्णवाचार्य जसे कृष्णवल्लभाचार्य हे कृष्णाचे उपासक होते, आधुनिक काळातील स्वामी भक्तिवेदांत प्रभुपाद ज्यांनी आंतरराष्ट्रीय स्वरूपाची 'इंटरनॅशनल सोसायटी ऑफ कृष्ण कॉन्शअसनेस (ISCKON)'





प्रवर्तित केली ते कृष्णभक्तच होते. महाराष्ट्रात भक्तिमार्गाचा पाया रचणारे ज्ञानेश्वर, हरिवरदा रचणारे कृष्णदयार्णव, भागवताच्या एकादश स्कंधावर टीका लिहिणारे संत एकनाथ हे सर्व कृष्णभक्तच होते. या कृष्णभक्तिची परंपराच ज्ञानेश्वरकन्या प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराजांनी पुढे चालविली आणि अद्वैत मधुराभक्तिचा संप्रदाय प्रवर्तित केला.

याचाच अर्थ असा की, कृष्णभक्तीच्या रूपात प्रवर्तित झालेला भक्तिमार्ग हा वैदिकच आहे. यज्ञसंस्थेचा ऱ्हास होत गेला तो यज्ञाच्या तांत्रिक क्लिष्ट कर्मकांडांमुळे. सामान्य माणसाला यज्ञाची प्रक्रिया बारकाईने पूर्ण करणे शक्य नव्हते. विशेषतः व्यापार आणि उद्योगात सातत्याने कार्यरत असलेल्या वैश्य-शूद्रांना किंवा राज्यव्यवस्थेत गुंतलेल्या क्षत्रियांनाही यज्ञ प्रक्रियेची पूर्तता सहजपणे करता येणे शक्य नव्हते. या गरजेची पूर्तता भक्तिमार्गाने केली असली तरी त्यात वैदिक परंपरेला कोठेही विरोध आहे असे दिसून येत नाही.

महाभारताच्या प्रारंभकाली भारतीय सांस्कृतिक जीवनात प्रचंड वैचारिक आंदोलने चालू झालेली होती. किंबहुना उपनिषदोत्तर कालात सुरू झालेल्या वैचारिक आंदोलनांना आणि संस्कृतिसमन्वयाला नैतिक आणि धार्मिक अधिष्ठान प्राप्त करून देण्यासाठीच मूळच्या जय ग्रंथाची नवी आवृत्ती संपादित केली असावी असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. यज्ञसंस्कृतीचा संपूर्ण लोप आणि स्थानिक लोकजीवनातील विविध उपासनापंथांचा उदय हे या काळाचे वैशिष्ट्य होय. या प्रचंड परिवर्तनातील घटनांचे, वैचारिक संघर्षांचे संग्रथन करून नव्या युगाला मार्गदर्शन करण्याचे कार्य महाभारताने केले. यामुळेच भारत ग्रंथाला पाचवा वेद अथवा खऱ्या अर्थाने 'जनवेद' हे नाव प्राप्त झाले. या काळाचा सर्वश्रेष्ठ प्रतिनिधी 'श्रीकृष्ण' हा होय. ब्राह्मणकाळात

'यज्ञरूप' बनलेला विष्णू यज्ञविरोधी भागवतधर्माचा प्रमुख देव बनला आणि थोड्याच अवधीत यज्ञाशी दूरान्वयानेही संबंध नसलेला श्रीकृष्ण विष्णूचा अवतार बनून नव्या युगाचा, नव्या धर्माचा प्रवर्तक ठरला. या काळात लोकमानसामध्ये असणाऱ्या विविध प्रवृत्तींचे एकीकरण करून संस्कृतिसमन्वयाचा एक महान् प्रयोग करणारा लोकनेता या दृष्टीने श्रीकृष्ण विविध थरांतील भारतीय जनतेचा सर्वश्रेष्ठ असा देव बनला. कृष्णाचे व्यक्तित्वही विविध धाग्यांनी गुंफले गेले आहे. अंधक-वृष्णी-सात्वत जनांचा सांस्कृतिक नेता, वेदकालापासून इंद्र आणि यज्ञसंस्कृती यांचा विरोधक, स्थानिक कृष्णजनांचा सेनानी, मथुरा प्रदेशातील गोपाल-आभीर लोकांचा नव्याने विकास पावू लागलेल्या कृषिसंस्कृतीचा प्रतिनिधी आणि शेवटी यज्ञविधीचे नव्या युगाला साजेसे संस्करण करून लोकसंग्रहपर कर्ममार्गालाच भक्तिचे अधिष्ठान प्राप्त करून देणारा गीतोपदेष्टा श्रीकृष्ण अशा विविध रंगांनी आणि वैचारिक धाग्यांनी कृष्णाचे व्यक्तित्व घडविले गेले आहे. या विविध विचारांना आणि उपासना पद्धतींना एकत्र आणण्याचे कार्य तत्कालीन वातावरणात असलेल्या वैदिक यज्ञविरोधाने आणि स्थानिक समाजाच्या देवता आणि उपासना पंथ यांच्या पुनरुज्जीवनाने घडवून आणले.

भक्तिमार्गाच्या प्रमुख प्रमाणग्रंथांमध्ये भागवत पुराणाला महत्त्वाचे स्थान आहे. वासुदेव-नारायण-विष्णू यांचे गोपालकृष्णात संपूर्ण रूपांतर झाल्यानंतर हे पुराण रचिले गेले आहे. निदान या पुराणातील बराचसा भाग इ.स. ८ व्या शतकाच्या सुमारास लिहिला गेला आहे हे निश्चित. सात्वत-वृष्णीजनांचा मूळ भक्तिमार्ग, 'ब्रह्म हेच एकमेव सत्य, नामरूपात्मक विश्व हा केवळ आभास' हा अद्वैत वेदान्त्यांचा वेदान्तविचार, श्रीकृष्णाची सगुणोपासना, तांत्रिकांची तंत्रोपासना, अशा विविध विचारांचे संकलन भागवतामध्ये केलेले आढळते. अर्थात हे सर्व विचार एकाच लेखकाचे आणि





एकाच काळातील नाहीत. यातील मूळ भक्तिविचार दक्षिण भारतातील विष्णोपासकांचा असावा. अंधक-वृष्णीजनांचा शोध घेताना दक्षिणेतील गोपालनवृत्तीने जगणाऱ्या स्थानिक लोकांचा विचार यापूर्वी केला आहेच. भागवतातील सगुणभक्ती यांची असावी :

**उत्पन्ना द्रविडे देशे साहं वृद्धिं कर्णाटके गता ।**
**क्वचित्क्वचिन्महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता ।।**
**वृन्दावनं पुनः प्राप्य नवीनेन सुरूपिणी ।**
**जाताहं युवती सम्यक् प्रेष्ठरूपा तु सांप्रतम् ।।**[८८]

या श्लोकात भक्तिविचार प्रथम द्रविड देशात उद्भवला असे जे म्हटले आहे ते या विष्णु - कृष्णभक्तीच्या बाबतीत खरे असावे. प्रारंभीची विष्णुभक्ती द्रविड देशातून उत्तरेला आल्यावर मथुराप्रदेशात कृष्णभक्ती बनली. तामिळनाडूमधील अळवार संतांच्या विष्णुभक्तिचे स्वरूप भागवतातील सगुण भक्तीशी पूर्ण जुळणारे आहे. येथे हा भक्तिविचार कनिष्ठवर्णीयांच्यामध्येच विकसित झाला असला तरी त्याचे मूळ अधिष्ठान वेदान्त विचारांचे आहे.

भागवतातील या विष्णु-कृष्णभक्तीतून अद्वैत वेदान्ताशी रूप असलेले त्याचे नाते सहज स्पष्ट होते. भागवतातील उल्लेख खालीलप्रमाणे आहे. (भा.२.९.१-२)

**आत्ममायामृते राजन्परस्यानुभवात्मनः ।**
**न घटेतार्थसंबंधः स्वप्नद्रष्टुरिवाज्जसा ।।**
**बहुरूप इवाभाति मायया बहुरूपया ।**
**रममाणी गुणेष्वस्यां ममाहमिति मन्यते ।।**[८९]

स्वप्नातील मायिक पदार्थांची अनुभूती हा जसा आभास असतो,

तसेच हे बाह्य बहुरूप विश्व परमात्म्याची केवळ माया आहे. या मायेमध्ये रममाण झाल्यामुळे 'मम', 'अहं' या भेदवृत्ती निर्माण होतात. वास्तविक हा सर्व बहुविधतेचा पसारा मायिक आहे. हे वेदान्त तत्त्वज्ञानाचे आवरण मूळ भक्तिविचाराला जोडलेले आहे हे सहज ध्यानात येते. स्थानिक भक्तिविचारांच्या आधाराने नवे भक्तिपंथ स्थापन करण्यात ब्राह्मणांनीच पुढाकार घेतला व आपल्या वैदिक परंपरेतील तत्त्वज्ञानाचे आवरण मूळ भक्तिविचारावर चढविले हे बार्थचे मत खरे असावे. नारायणीय सात्वतधर्मातून वासुदेव विष्णु उपासनेला जे तात्त्विक स्वरूप दिसून येते त्यावरून मूळ भक्तिविचारच वेदान्तपर होता असे समजणे आवश्यक आहे.

विश्वनिर्मितीची प्रक्रिया स्पष्ट करताना सर्वच पुराणांप्रमाणे भागवतानेही सांख्य विचार स्वीकारला आहे. अर्थात सांख्य आणि वेदान्त यांचा समन्वय करण्यात आला आहे. भागवतातील भक्तिचे मुख्य स्वरूप नामस्मरण अथवा हरिकीर्तन हे आहे. भागवतातील उल्लेख खालीलप्रमाणे आहे.

**कृते यद्ध्यायतो विष्णु त्रेतायां यजतो मखैः ।**
**द्वापरे परिचर्यायां कलौ तद्धकीर्तनात् ।।**[१०]

सर्व जातीच्या, सर्व वर्णांच्या लोकांना अत्यंत सुलभ असे परमेश्वरी भक्तिचे हे साधन मुळात स्थानिक देवतांच्या उपासनेतून आले असले पाहिजे, म्हणूनच भक्ती प्रथम द्रविड देशात उत्पन्न झाली असे म्हटले जाते. द्रविड देश हा आर्य संस्कृतीचाच एक अपरिहार्य भाग होता. उत्तरकाळात सुरू झालेल्या संस्कृतिसमन्वयाच्या प्रक्रियेत या साध्या सुलभ भावात्मक उपासनेला तात्त्विक स्वरूप प्राप्त झाले.





भागवतातील भक्तिमार्गाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे या शुद्ध भावनात्मक साधनेला तांत्रिक उपासनेचा एक प्रवाह येऊन मिळाला हे होय. या पुढील भक्तिसाधनेचे स्वरूपच या प्रवाहामुळे पालटून गेले. स्थानिक समाजाच्या मंत्रतंत्रात्मक, पूजाविधीतून हा प्रवाह भक्तीला मिळाला.

भागवतातील भक्तिमार्गात रासपंचाध्यायी हा एक महत्त्वाचा भाग आहे. या भागात भगवान श्रीकृष्णाने वृंदावनात गोपींसमवेत केलेल्या रासक्रीडेचे उत्कट शृंगारिक वर्णन आले आहे. ध्यानावस्थेत या रासक्रीडेचे साक्षी होऊन अथवा या रासक्रीडेचा एक भाग होऊन राहावे हे माधुर्यभक्तिचे एक महत्त्वाचे अंग आहे. रासक्रीडेत सहभागी व्हावयाचे असेल तर ते केवळ गोपीचा भाव धारण करूनच होता येते. यासाठी राधेप्रमाणे अथवा मीरेप्रमाणे कृष्णाला पती मानून माधुर्यभाव जागृत करणे हे साधकाचे उद्दिष्ट असते. ही भूमिका सिद्ध व्हावी यासाठी कात्यायनी व्रताचे अनुष्ठान गुलाबराव महाराज करीत असत. कात्यायनी व्रताच्या वेळेस ते पूर्णपणे स्त्री-वेश धारण करीत. याप्रसंगी कपाळास कुंकू, गळ्यात मंगळसूत्र, हातात बांगड्या असा त्यांचा वेश असे. कात्यायनीदेवीच्या प्रार्थनेप्रीत्यर्थ केलेल्या अभंगात प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांची ही भूमिका अधिक स्पष्ट होते, हा अभंग खालीलप्रमाणे-

**आनंदाच्या परिच्छिन्ने । ज्ञान तेचि वृत्ति होणे ।।**
**एकचि हे अधिष्ठान । देहींचेही एकपण ।।२।।**
**हेचि रूप कात्यायनी । प्रार्थितसो भावे मनी ।।३।।**
**मज व्हावा कृष्ण पति । नको कैवल्यादि मुक्ति ।।४।।**
**जन्मज्ञान मृत्युज्ञान । कृष्णी विरे ज्ञानपण ।।५।।**
**जन्मोजन्मी तोचि व्हावा । भावे करीन मी सेवा ।।६।।**
**ज्ञानेश्वर मायबाप । त्यांच्या कृपे हा संकल्प ।।७।।**[११]

ही भूमिका सकृतदर्शनी मानसिकदृष्ट्या काहींशी विकृती आहे असेही मत काही विद्वज्जनांनी मांडले आहे. हे मत वस्तुतः आधारहीन असून भारतीय तत्त्वज्ञानाचे सार न समजल्याचे द्योतक आहे. गुलाबराव महाराजांचा हा भक्तिभाव किंबहुना संपूर्ण भारतीय साधना हीच सांख्यांवर आधारलेली आहे. सांख्यानुसार प्रकृती व पुरुष दोन तत्त्वे मानली जातात. यातील पुरुष हे चैतन्य आहे तर प्रकृती ही अचेतन, जड आहे. यातील चेतन पुरुष हा एकमेव श्रीकृष्ण हाच असून अन्य सर्व प्रकृती आहेत. त्यामुळे एक श्रीकृष्ण वगळता अन्य सर्वांना प्रकृती - स्त्री ची म्हणजेच गोपीची भूमिका घेतल्याशिवाय गत्यंतर नसते. त्यामुळे मी प्रकृती आहे, या भूमिकेतून पुरुषरूपी कृष्णाची उपासना करणे हे माधुर्यभक्तिचे अंतिम लक्ष्य ठरते.

**पांचरात्र सात्वतधर्म**

'पांचरात्र सात्वत मत' या नावाने हा पूजाविधी फार प्राचीन काळापासून अस्तित्वात होताच. वेदपूर्व आर्येतर समाजाच्या मंत्रतंत्रात्मक धार्मिक विधीमध्ये याचा उगम असावा असे काही अभ्यासकांचे म्हणणे आहे. भागवतामध्ये सात्वत मताचा 'तंत्र' म्हणूनच उल्लेख केला आहे :

**तेनोक्तं सात्वतं तंत्रं यज्ज्ञात्वा मुक्तिभाग् भवेत् ।**
**यत्र स्त्रीशूद्रदासानाम् संस्कारो वैष्णव स्मतः ।।**[९२]

यातील स्त्री-शूद्र-दास यांचा उल्लेखही महत्त्वाचा आहे. तारापाद भट्टाचार्य यांनी आपल्या The Cult of Brahma या प्रबंधात 'रात्रसंप्रदाया'चा वेदपूर्व 'ब्रह्मसंप्रदाया'शी संबंध असल्याचे म्हटले आहे. पंचरात्र, नवरात्र, सप्तरात्र या संख्यासंप्रदायांचा उगम यातूनच झाला असावा. तारापाद भट्टाचार्य म्हणतात-

"Brahma was the earliest creator God of India. He was perhaps



a pre-vedic God. His worship was suppressed by the vedic religion; but it survived in various parts of India especially in Eastern India among the Asuras of the Vedas and even in the Historic period among the low class people."[९३]

भागवतामध्ये पांचरात्र आगमविधीचा उगम 'आसूर' परंपरेत दाखविण्याचा जो प्रयत्न केला आहे तो वरील विचाराच्या संदर्भात सूचक आहे. 'असूर' हा शब्द स्थानिक अवैदिक समाजाला उल्लेखून योजिला आहे असे समजणे चुकीचे आहे. 'असू' = प्राणसामर्थ्य, हे सामर्थ्य वैदिक देवतांच्याजवळ होते. वैदिक आर्य असूरपरंपरेशी जवळून संबंधित होते. असूर हे देवांचे ज्येष्ठ बंधू समजले जात होते. वैदिक काळातच एकेश्वरीपंथाचा विकास झाला होता. परमेश्वरी भक्तिची कल्पना त्यांनी आत्मसात केली होती. या त्यांच्या सांस्कृतिक जीवनात स्थानिक उपासनामार्गांचे प्रवाह येऊन मिळाले. त्यातच मंत्रतंत्रात्मक विधीचा एक प्रवाह असावा.

'पांचरात्रविधी' वैदिक परंपरेतून आला असावा असे मानण्यास भरपूर आधार आहे. पांचरात्र संहितेमध्ये माया, शक्ती, महालक्ष्मी, महाविद्या आणि महाकाली या देवतांचा उल्लेख आहे. हा निश्चित वैदिक देवतापरंपरेतून आला असला पाहिजे. पांचरात्र नारायणीय धर्मामध्ये सात चित्रशिखंडींचा उल्लेख येतो. या सात चित्रशिखंडीनी हे शास्त्र निर्माण केले असे तेथे म्हटले आहे. हे सात चित्रशिखंडी वैदिक परंपरेचे असावेत असे त्यांच्या उपासनेवरून व इतर अनेक संदर्भांवरुन वाटते, हे यापूर्वीच आपण पाहिले आहे. शिखिन्, शिखंडी, शिखंडीनी यांचा संबंध रुद्र, देवी, कृष्ण या वैदिक देवतांशी येतो. वैदिक साहित्यात 'शिखीं'चा उल्लेख येतो. 'वरशिख' हा इंद्राचा शत्रू होता. इंद्राने वरशिखाच्या पुत्रास ठार केले होते. तथापि तो अवैदिक नव्हता. (याचा उल्लेख ऋ. ६.२७ मध्ये येतो.) पांचरात्र जयाख्य संहितेत 'शिखिन्' हे पांचरात्र

संप्रदायापैकी एक होता असा उल्लेख आहे. आर्यपूर्वांच्या यति-मुनिपरंपरेपैकी हे असावेत असाही एक तर्क आहे. सांख्यशास्त्राचे आद्यप्रवर्तक कपिल, आसुरी आणि पंचशिख हे अवैदिकच असावेत. सांख्याचे मूळ वैदिकांच्या यज्ञसंस्कृतीत नाही असे दाखविणारा भरपूर पुरावा आहे. महाभारतामध्ये पंचशिख व जनक यांच्या संवादामध्ये पंचशिखाची जी मते व्यक्त झालेली दिसतात त्यांचा बौद्धांच्या विचारावर अतिशय खोल परिणाम झालेला आहे. कपिल, सांख्य, पंचशिख, बौद्ध या मतांची वाढ वैदिक यज्ञसंस्कृतीच्या कक्षेबाहेर झाली आहे असे म्हणता येत नाही.

मूळच्या पांचरात्र नारायणीय अथवा सात्वत शास्त्रावर उत्तरकाळात वैदिकी संस्कार करून ब्राह्मणांनी हे शास्त्र आपल्या संस्कृतीत समाविष्ट करून घेतले. वैदिक मतानुयायी असलेल्या पांचरात्र धर्मावर उत्तरकाळात अवैदिक संस्कार झाले असे मानण्याला काहीही आधार नाही. भारतीय समाजाचे जसजसे आर्यीकरण होत होते तसतसे स्थानिक लोकांचे आचारविचार, धर्मविधी या सर्वांचेच स्वरूप वैदिक आचारविधींशी सुसंगत करून घेण्यात येत होते. यातूनच मूळच्या नारायणीय पांचरात्र शास्त्रावर यज्ञसंस्कृतीचे संस्कार झाले. भारतीय परंपरेत या शास्त्राला सनातन वैदिकांचा कडवा विरोध आहे. कूर्मपुराण, पाराशरपुराण, वसिष्ठसंहिता, आश्वलायन स्मृती इ. नी पांचरात्र पंथीयांचे अनुसरण केले आहे. शांडिल्यांना चार वेदांमध्ये अंतिम समाधान न लाभल्यामुळे त्यांनी या शास्त्राची निर्मिती केली असे मत शंकराचार्यांच्या काळात प्रसृत होते हे आचार्यांच्या भाष्यावरून दिसते. शंकराचार्य म्हणतात-

**'वेदप्रतिषेधश्च भवति । चतुर्षु वेदेषु परं श्रेयोऽलब्ध्वा शाण्डिल्य इदं शास्त्रमधिगतवान् इत्यादि वेदादिदर्शनात् ।।'[१४]**





नारायणीय धर्मात वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध अशा चार व्यूहांची कल्पना मांडिली आहे. अद्वैत वेदान्त्यांचा या पंथाला विरोध असण्याचे हे एक कारण असू शकत नाही. शंकराचार्यांनी पांचरात्र नारायणीयाचे यासाठीच खंडन केले आहे. हा मुद्दा त्यास अवैदिक ठरविण्यास पुरेसा नाही. ब्रह्मसूत्रावरील भाष्यात आचार्यांनी सात्वत पांचरात्राची पाच उपासना अंगे दिली आहेत.

(१) अभिगमन - काया -वाचा-मनाने परमेश्वराशी तादात्म्य होऊन मंदिरातील मूर्तींचे दर्शन घेणे,

(२) उपादान - पूजासाहित्य संपादन करणे,

(३) इज्या अथवा पूजा,

(४) स्वाध्याय अथवा मंत्रपठण आणि

(५) ध्यानयोग

शंकराचार्यांनी या अभिगमनादी पाच उपासनाप्रकारांना विरोध केलेला नाही. कारण ईश्वराच्या आराधनेला श्रुतींचा पाठिंबा आहे. पांचरात्र संहितेमध्ये उपासनेचे चार पाद सांगितले आहेत : ज्ञान, योग, क्रिया आणि चर्या. यापैकी शेवटच्या दोन पादांवरच पांचरात्र मताचा खरा भर आहे. मूर्तींची निर्मिती, प्रतिष्ठापना, मंत्र, विविध उपचार, मंदिर निर्मिती इत्यादींना 'क्रिया' म्हणतात आणि भक्ताने करावयाची व्रते, उपासना इत्यादींना 'चर्या' म्हणतात. या सर्व क्रिया आणि चर्या तांत्रिक स्वरूपाच्या आहेत. तथापि, हे अवैदिक आहे असे मात्र म्हणता येत नाही. तंत्रमार्ग हा वेदविरोधी असल्याचे मतच मुळात चुकीचे आणि गैरसमजुतीवर आधारलेले आहे. 'तंत्र' या शब्दाचा अर्थ 'तनोति तारयति इतितन्त्र' तंत्र म्हणजे प्रसाराचे विस्तार करण्याचे माध्यम

असा याचा अर्थ होतो. तंत्रामध्ये तंत्र, मंत्र आणि यंत्र अशा सर्व बाबींचा समावेश होतो. वेदांकडे जर एक दृष्टिक्षेप टाकला तर, वेदातील प्रत्येक रचना मंत्रमय आहे. वैदिक मंत्राच्या उच्चाराचे काटेकोर महत्त्व पाळले जाते. वैदिक मंत्र ज्या छंदात रचले आहे ते छंद विशिष्ट अक्षरांचे असून केवळ शाब्दिक सौंदर्य वाढविणे एवढाच त्याचा उद्देश नाही. विशिष्ट उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी वापरावयाचे मंत्र हे विशिष्ट छंदात असावे लागतात. तसेच, वैदिक यज्ञविधित यज्ञचितीची आखणी भौमितिक काटेकोरपणाने करावयाची असून उद्दिष्टाच्या पूर्ततेनुसार करावी लागते. यातच चतुरस्त्र श्येनचितीसारखे युद्धात जय मिळविण्यासाठी वा शत्रूचा नाश करण्यासाठी करावयाचे तांत्रिक प्रयोगही समाविष्ट आहे. वेद आणि तंत्र यांचा संबंध तपासून पाहणे हे प्रस्तुत प्रबंधाचे उद्दिष्ट नाही. तथापि, तंत्रमार्ग हा अवैदिक नाही एवढे लक्षात येण्यापुरते विवेचन येथे करण्यात आले आहे.

या सर्व उल्लेखांवरून एक गोष्ट स्पष्ट दिसून येते की, पांचरात्र - सात्वत - नारायणीय धर्म प्राचीन काळापासून अवैदिक परंपरेतून आला असावा अशी जी समजूत दिसून येते ती चुकीची असून भागवतधर्मातील तंत्रोपचारांचे मूळ या पंथाच्या वैदिक परंपरेतच असले पाहिजे.

भागवतधर्मात भक्तिची विविध कर्मकांडे या तंत्रोपचारातून आली. मंदिररचना, मूर्ती, षोडशोपचार पूजा, नैवेद्य, नृत्य, गायन, निरनिराळी व्रते, उपवास इ. उपचार भक्तिमध्ये प्रविष्ट होऊन पुन्हा एक प्रचंड मायाजालच तयार झाले. या तंत्रोपचाराचे दुसरे एक वैशिष्ट्य म्हणजे 'वामाचार' विधी हे होय. वामाचाराचा खरा अर्थ लक्षात घेता, वामा म्हणजे स्त्री, आणि आचार. ज्या पंथामध्ये स्त्रीचा आचारधर्म पाळला जातो, तो वामाचार असा याचा अर्थ होतो. एका तांत्रिक उल्लेखात म्हटलेच आहे **'वामाभूत्वायजेत् शिवम्'**.





चैतन्यरूपी शिवतत्त्वाची उपासना वामा म्हणजे स्त्रीची भूमिका घेऊनच करावयाची असते. ही भूमिका हेच मधुरा भक्तिचे मूलभूत रहस्य असून भागवतातील राधाकृष्णाच्या प्रेमातून हे उत्कटपणे व्यक्त झाले आहे. यातील राधा ही सांख्यांच्या मूलप्रकृतीचे प्रतीक असून कृष्ण हे चैतन्यघन पुरुषाचे प्रतीक आहे. ही भूमिका महाराजांच्या अभंगातूनही उत्कटपणे मांडलेली दिसून येते.

**न बैसे हे चित्त राधिकाचरणी । उपाय करोनी देखिलीया ।।**
**वैयक्तिक राधा गोपिका विशिष्ट । ऐसे भक्तिनिष्ठ मन न ये ।।**
**सांगा व्रजराया, काय करू यासी । तुमच्या कृपेसी साधावया ।।**
**गोपिका समष्टि मानोनियां राधा । समाधान बोधा करू काई ।।**
**आळंदीवल्लभा, माझे ऐसे आहे । उचित ते लाहे तुम्हापाई ।।**[१५]

माधुर्यभक्तीची ही भूमिका स्पष्ट होण्यासाठी मधुराभक्तीच्या मानसशास्त्राचा विचार करणे आवश्यक ठरते. तत्पूर्वी भक्तिविचाराचा उद्‌गम विशिष्ट परिस्थितीत कसा झाला आणि त्याचा विकास कोणकोणत्या अवस्थांतून होत गेला याचे जे विवेचन केले त्याचे थोडक्यात सिंहावलोकन करू.

**भक्तीची व्याख्या :**

ईश्वरापुढे संपूर्ण शरणागती स्वीकारून त्याच्या प्रसादाची याचना करणे हा भक्तिचा गाभा होय. निसर्गातील भव्य, रौद्र घटनांची भीती आणि सर्वसमर्थ ईश्वराची भीती या भावना भिन्न पातळीवर व्यक्त होतात. निसर्गाच्या भीतीचा प्रतिकार करण्याच्या प्रवृत्तीमधून भक्ती विचार संभवतो, ईश्वराच्या भीतीमधून शरणागती प्रगट होते. याचीच पुढची पायरी म्हणजे ईश्वरातील

त्या सर्वसमर्थ अतिमानवी शक्तीवरील आत्यंतिक प्रेम अथवा भक्ती ही होय. ऋग्वेदामध्ये समर्थ ईश्वराची कल्पना ऋषींना स्फुरली असे दिसून येते. वरुणसूक्तांमध्ये देवतेची भीती व्यक्त होते. भीतीच्या पोटी देवतेला हवि अर्पण करून तृप्त करण्याची भावना दिसून घेते. यज्ञातील हवीने देवतांचे सामर्थ्य वाढविण्याची, त्यांना भावित करण्याची कल्पना आणि देवतेला वश करून घेण्यासाठी बळी देणे, हवि अर्पण करणे या दोन भिन्न कल्पना आहेत. तथापि यातूनच भक्तिचा विकास झाला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. ही भूमिका 'देवघेवीच्या भावनेवर' आधारलेली आहे. ही भावना शुद्ध भक्तिची म्हणता येणार नाही, तथापि सकाम भक्ती हे भक्तिचेच एक अंग आहे. ईश्वरावरील शुद्ध निरपेक्ष प्रेम हा भक्तिविचाराचा खरा आधार होय. गीतेतील उल्लेख खालीलप्रमाणे आहे -

**मच्चित्ता मद्‌गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ।।**
**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।**[९६]

भगवद्‌गीतेमधील वरील दोन श्लोकांत भक्तिचे सर्व महत्त्वाचे विशेष व्यक्त झाले आहेत. 'माझ्या ठिकाणी चित्त लावून, व माझ्या ठायी जीवप्राण ठेवून एकमेकाला बोध करीत व माझ्या कथा सांगत (त्यांतच) नेहमी संतुष्ट व रममाण असतात. याप्रमाणे नेहमी युक्त म्हणजे समाधानाने राहून प्रीतिपूर्वक मला भजणाऱ्या लोकांस ते मला येऊन पोचतील असा (समत्व-) बुद्धीचा योग मीच देत असतो.'

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी भक्तीविषयी केलेले भाष्य लक्षात घेण्यासारखे आहे. महाराज म्हणतात, "याच आधाराने पुढे नारदांनी आणि





शांडिल्यांनी भक्तिसूत्रे रचिली. 'सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा।' या सूत्रात परमेश्वराला प्रतिज्ञापूर्वक भजण्याचा आशय व्यक्त झाला आहे. परमेश्वरावरील आत्यंतिक प्रेम हे भक्तिचे महत्त्वाचे लक्षण परमेश्वराहून अन्य काही सुचत नाही, दुसऱ्या कशाच्याही ठिकाणी मन रममाण होत नाही. क्षणभर जरी परमेश्वराचे विस्मरण झाले तर मन व्याकुळ होऊन जाते, 'तद्विस्मरणे परम व्याकुलतेति।।' भक्ताने आपल्या सर्व क्रिया त्या परमात्म्यासाठीच केल्या पाहिजेत."[९७]

मनुष्य आपल्या जीवनात जे जे करतो ते ते परमेश्वरासाठीच असले पाहिजे. प्रत्येक कृतीतून, अगर शब्दातून त्याला परमेश्वराचीच जाणीव अखंडपणे होत राहिली पाहिजे. परमेश्वरचिंतनात खंड पडता उपयोगी नाही. रामानुजांनी भक्तिची व्याख्या करताना या अखंड चिंतनाला - ध्यानाला महत्त्व दिले आहे. अखंड तैलधारेप्रमाणे परमेश्वराचे चिंतन अखंडपणे झाले पाहिजे. भक्त जे एकमेकांशी बोलतात तेही संभाषण, कथन, निवेदन, परमेश्वराविषयीच असले पाहिजे. अत्यंत प्रिय वस्तूबद्दल वाटणारे प्रेम साधारणपणे भक्तीच्या जातीचे असते. पण ती भक्ती नव्हे. भक्तिकल्पनेचा हा आविष्कार वैदिक वाङ्मयात कोठेही झालेला नाही. इंद्रालासुद्धा शेवटी यज्ञाच्या आहुतींचा कंटाळा आला. त्यालाही चिरंतन, निरपेक्ष सुखासाठी ब्रह्मज्ञानाची वाट धरावी लागली. श्वेताश्वतर उपनिषदात प्रथम 'भक्ती' हा शब्द आढळतो. पण उपनिषदे ज्ञानपर असल्याने भावप्रधान भक्तिमार्गाचा तेथेही फारसा विकास झाला नाही. भक्ती आणि ज्ञान यांत भेद आहे. भक्ती ही ज्ञानाच्या पुढची अवस्था आहे.

**मद्‌गुणश्रुतिमात्रेण मयि सर्वं गुहाशये ।**
**मनोगतिरविच्छिन्ना यथा गंगाभसोऽम्बुधौ ।।**[९८]

या भागवतातील श्लोकात अविच्छिन्न परमेश्वरचिंतन हे भक्तिचे लक्षण सांगितले आहे.

प्राथमिक अवस्थेमध्ये परमेश्वरचिंतन हेही सगुण मूर्तीच्या ठिकाणी केंद्रित झालेले असते. भक्तिची ही भावनात्मक अवस्था अधिक व्यापक झाल्यावर सर्व विश्वच परमात्मस्वरूप बनते. ही कल्पना भगवद्‌गीतेत अधिक विस्ताराने सांगितली आहे. भागवत, नारायणीय आख्यान यांमध्ये एकान्त भक्तिचे वर्णन अधिक आहे. अर्थात भागवतातही भक्तिची यापुढची अवस्था वर्णिली आहे. जीवनातील सर्व कर्मे वासुदेवार्पण बुद्धीने करावयास भागवत सांगतेच.

**वासुदेवपरः वेदाः वासुदेवपरा मखाः ।**
**वासुदेवपरः योगः वासुदेवपरा क्रियाः ।।**
**वासुदेवपरं ज्ञानं वासुदेवपरं तपः ।**
**वासुदेवपरो धर्मो वासुदेवपरा गतिः ।।**[९९]

ही भागवतातील कल्पना गीतेतील कर्मभक्तीशी जुळणारी आहे.

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यासि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।**[१००]

सर्व कर्मेच परमेश्वररूप झाली पाहिजेत. येथे केवळ रागात्मिका भक्ती सांगितलेली नाही. परमेश्वराच्या विश्वव्यापक स्वरूपाची अनुभूती आल्याशिवाय भक्तिची ही अवस्था प्राप्त होणे शक्य नाही. मन एका ठिकाणी केंद्रित करणे आणि मन विश्वाएवढे व्यापक करणे या दोन क्रियांमध्ये जो भेद आहे तोच या दोन भक्तिप्रकारांत आहे. भगवद्‌गीतेला दुसऱ्या भक्तिप्रकाराला अधिक महत्त्व द्यावयाचे आहे. गीता देखील एकांत भक्ती





सांगतेच.

**मन्मना भव मद्‌भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।।**
**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।।**[१०१]

या श्लोकांत परमेश्वराला सर्वस्वार्पणबुद्धीने शरण जाण्यास सांगितले आहे हे खरे. पण शरण येऊन केवळ माझे भजनपूजन कर एवढेच गीतेने सांगितलेले नाही. भगवद्‌गीतेने रागात्मिका भक्तीला सामाजिक कर्तव्यकर्मांचे अधिष्ठान देऊन भक्तिविचाराला एक नवेच वळण लाविले. 'लोकसंग्रह' ही कल्पना भक्तिमध्ये समाविष्ट करण्याचा हा प्रयत्न निःसंशय त्या काळात नवा होता, एवढेच नव्हे तर उपनिषद्विचार आणि बौद्धांचा संन्यासवाद यांच्या संदर्भात सामाजिक दृष्ट्या आवश्यक असाच होता.

**'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः'**[१०२] हा नवा संदेश गीतेने दिला. प्रस्तुत प्रकरणाच्या उत्तरार्धात या सर्वच प्रश्नांचा अधिक विस्ताराने विचार करू. सध्या भक्तिचा वरील सर्वसामान्य अर्थ गृहीत धरून पुढे जाऊ. वैदिक आर्यांच्या आणि आर्येत्तरांच्या सांस्कृतिक जीवनातून जे भिन्न भिन्न विचारप्रवाह एकत्र आलेत त्यांमधून भक्तिविचाराचा उगम झाला आणि विविध अवस्थांमधून त्याचा विकास होत गेला. संस्कृतिसमन्वयाच्या या प्रक्रियेचे यापुढे अवलोकन करू.

सनातन भारतीय धर्मांच्या आध्यात्मिक साहित्यात प्राचीनतम भक्तिविषयक साहित्य म्हणजे 'भक्तिसूत्र' होय. सूत्र म्हणजे अत्यंत संक्षिप्त अशी एखाद्या विषयाचा निर्देश करणारी मांडणी होय. सूत्र हे एका शब्दाचे वा

एकापेक्षा जास्त शब्दाचे असते. परंतु ते पूर्ण वाक्य असतेच असे नाही. भारतीय तत्त्वज्ञानात सर्वच दर्शनांची मांडणी सूत्र पद्धतीने झाली आहे. वेदांताची व्यासांनी लिहिलेली ब्रह्मसूत्रे, कर्मकांडाची जैमिनीने लिहिलेली पूर्वमीमांसा सूत्रे, भारतीय अणुवादाची कणादाने लिहिलेली वैशेषिक सूत्रे, लोकप्रिय अशा योगदर्शनाची पतंजलीने लिहिलेली योगसूत्रे वा आद्य व्याकरणकार पाणिनी याची व्याकरणसूत्रे असे सूत्रग्रंथ उपलब्ध आहेत. त्याचप्रमाणे भक्तिशास्त्राचे नारद आणि शांडिल्य यांचे सूत्रग्रंथ उपलब्ध आहेत.

नारदाने आपल्या भक्तिसूत्रात भक्तिची व्याख्या, '**सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा**[१०३] - त्या परमेश्वराविषयी अत्यंत प्रेमच भक्ती आहे.' अशी केली असून भक्तिचे स्वरूप स्पष्ट करीत 'अमृतस्वरूपा च - भक्ती ही अमृतस्वरूप आहे' असेही म्हटले आहे.

महर्षी शाण्डिल्याने भक्तिची व्याख्या '**सा परानुरक्तिरीश्वरे**[१०४] - ईश्वरावर परम अनुराग, परम प्रेम म्हणजेच भक्ती' अशी केली आहे.

नारद आणि शांडिल्य यांच्या भक्तिसूत्रावर तत्त्वज्ञानातील इतर सूत्रांवर आहेत तसे भाष्यग्रंथ वा वार्तिके उपलब्ध नाहीत. तथापि शांडिल्याच्या भक्तिसूत्रावर मधुसूदन सरस्वती यांचा 'भक्तिरसायन' हा ग्रंथ उपलब्ध आहे. तसेच या दोन्ही भक्तिसूत्रांवर दासगणू महाराजांनी ओवीबद्ध टीका लिहिली आहे. त्याचप्रमाणे गुलाबराव महाराजांनीही भक्तिसूत्रावर निरूपण लिहिले आहे.

वरील विवेचनावरुन हेच स्पष्ट होते की, ईश्वराविषयी जे परम् - उत्कट प्रेम आहे, तेच अमृत आहे, तीच खरी भक्ती आहे. व्याकरणाच्या दृष्टीने 'भक्ती' शब्दाचा अर्थ 'सेवा' असा होतो, कारण 'भक्ती' शब्द 'भज्





सेवायाम्' धातूपासून बनला आहे. म्हणून तसा अर्थ होणे उचित आहे. प्रेम हे सेवेच फळ असून भक्तीच्या साधनाची अखेरची सीमा आहे. जसे वृक्षाची सार्थकता फळे येण्यावर आहे, तसेच भक्तिची पूर्तता आणि गौरव भगवंतावर परम प्रेम जडण्यातच आहे. प्रेम हीच त्याची पराकाष्ठा आहे आणि प्रेमासाठीच सेवा केली जाते. म्हणून वस्तुतः भगवंतावर अनन्य प्रेम असणे हीच भक्ती आहे.

ईश्वरभक्तीत वर्ण, आश्रम, लिंग, वय आणि अन्य अधिकारभेद यांचे फारसे महत्त्व नाही. विद्या, धन आणि बळ हे सुद्धा मुख्य नाहीत. तसेच सदाचार आणि सद्‌गुणांकडेही ईश्वर खास ध्यान देत नाही. ते केवळ एक प्रेम बघतात. एका कवीने म्हटलेही आहे -

**व्याधस्याचरणं ध्रुवस्य च वयो विद्या गजेन्द्रस्य का**
**का जातिर्विदुरस्य यादवपतेरुग्रस्य किं पौरुषम् ।**
**कुब्जायाः कमनीयरूपमधिकं किं तत्सुदाम्नो धनं**
**भक्त्या तुष्यति केवलं न च गुणैर्भक्तिप्रियो माधवः ।।**[१०५]

'व्याधाचे असे कोणते चांगले आचरण होते ? ध्रुवाचे वय ते काय होते ? गजेन्द्राजवळ कोणती विद्या होती? विदुराची कुठली उत्तम जात होती ? यादवपती उग्रसेनाचा कुठला पुरुषार्थ होता? कुब्जेचे असे कोणते सुंदर रूप होते ? सुदाम्याजवळ कुठले धन होते ? भक्तिप्रिय माधव फक्त एका भक्तीनेच संतुष्ट होतात, गुणांनी नव्हे.'

भक्तात भक्तीच्या प्रभावाने सदाचार आणि सद्‌गुण आपोआपच येतात, म्हणून ईश्वरभक्तीत सदाचार आणि सद्‌गुणांना एवढे महत्त्व नाही. अर्थात् याचा अर्थ असा नाही की, ईश्वरभक्तीत सदाचार आणि सद्‌गुणांची

आवश्यकताच नाही. जसे आजारी माणसाला बरे होण्यासाठी मुख्य औषध घ्यावेच लागते, पण त्याचबरोबर पथ्यपाण्याचीही आवश्यकता असते, त्याप्रमाणे जन्ममरणरूपी भवरोगातून सुटण्यासाठी ईश्वरभक्ती परम् औषध आहे आणि सद्गुण व सदाचार पथ्य आहे. आजारी माणसाने बरे होण्यासाठी औषध घेतले, पण पथ्यपाण्याकडे लक्ष दिले नाही तर त्याचा आजार बरा होत नाही, पण सदाचार आणि सद्गुणरूपी पथ्याची कमतरता असूनही भक्तिरूपी औषध घेतल्याने भवरोगांपासून सुटका होते. कारण भक्तिरूपी औषध पथ्याचेही काम करते. एवढेच नाही तर, कुपथ्य सेवनापासून होणाऱ्या नाना दुर्गुणांचा आणि विघ्नरूपी दोषांचा नाश तसेच सदाचार-सद्गुणरूप पथ्याचे पालनही ईश्वरभक्तिमुळेच होते आणि मग रोगाचे मूळच कायमचे नाहीसे होते. म्हणूनच ईश्वरभक्ती फार मोठे औषध आहे.

भक्तिचे महत्त्व गुलाबराव महाराजांच्या दृष्टीने फार मोठे आहे. ही भूमिका खालील अभंगात फार चांगल्यारीतीने स्पष्ट झाली आहे.

**वेदविद्या होय दासी । शास्त्रविद्या राहती वेशी ।**
**कला वारांगना त्यांसी । प्रवेश नव्हे आंत ।।**
**आत्मविद्या शहाणपणा । परि ती खेळते आंगणा ।**
**ब्रह्मविद्या द्वारी जाणा । रक्षणासी राहिली ।।**
**महावाक्य वारा घाली । आनंद तो करी खोळी ।**
**शांति पाळणा निजली । मजपुढे येवोनी ।।**
**सखी माझी भगवद्भक्ती । मोकळीक तिजप्रती ।**
**उचलोनी कडिये प्रती । सर्वदां मजला घेते ।।**
**तेहि विरोनिया थिते । भक्तीच्या पाया पडे नित्य ।**
**झाली एकाएकी स्तब्ध ते । आरुते परते नोहे ।।**





**भक्ति माय माउली । सदा कृपेची साउली ।**
**ज्ञानेश्वराचे पाउली । भक्ति राहो अखंडित ।।**[१०६]

या अभंगातून महाराजांनी हे स्पष्ट केले आहे की, वेदविद्या ही भक्तिची दासी आहे, तर आत्मविद्या ही भक्तीच्या अंगणात खेळते. ब्रह्मविद्या ही तिच्या रक्षणासाठी उभी राहिली आहे तर, श्रुतीची महावाक्ये भक्तीला वारा घालतात. याप्रमाणे भक्ती ही माऊली आहे आणि ती अखंड चित्तात राहो अशी प्रार्थना येथे महाराजांनी केली आहे.

**भक्तीचे प्रकार :**

भक्तीचे प्रामुख्याने दोन प्रकार करता येतील.

१. ज्ञानपूर्व भक्ती

२. ज्ञानोत्तर भक्ती

परमेश्वराचे स्वरूप आकलन होण्यापूर्वीची भक्ती, ती 'ज्ञानपूर्व भक्ती' होय. तर परमेश्वराचे स्वरूप आकलन झाल्यानंतरची जी भक्ती, ती 'ज्ञानोत्तर भक्ती' होय. यासच साधनरूप - जिला वैध किंवा नवविधा नावनेही ओळखतात आणि साध्यरूप - जिला प्रेमा-प्रेमलक्षणा या नावांनीही ओळखले जाते. यात सेवा साधनरूप आहे आणि प्रेम साध्य आहे.

भक्तिचे हे प्रकार आकृती क्र. १ मध्ये प्रदर्शित करण्यात आले आहेत.

आकृती क्र. १ आणि २ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ज्ञानपूर्व आणि ज्ञानोत्तर भक्तिप्रकारांचे संक्षिप्त विवेचन करणे अस्थानी ठरणार नाही.

## आकृती क्र. १




*स्रोत : श्री. कृ.मा. घटाटे संपादित भक्तिशास्त्र, पृ. ११८*

**ज्ञानपूर्व भक्ती :**

हीच भक्ती 'साधन भक्ती' म्हणून ओळखली जाते. यासच 'उपासना' असेही म्हटले जाते. परमेश्वराचे ज्ञान प्राप्त होण्यापूर्वीची भक्ताने केलेली ईश्वराची आराधना म्हणजेच 'ज्ञानपूर्व भक्ती' असेही म्हणता येईल. तिचे प्रकार खालील प्रमाणे -

१. अवस्तुभावन - ही प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज भक्तिशास्त्रातील





एक महत्त्वाची संकल्पना आहे. याविषयी घटाटे यांनी म्हटले आहे, "या प्रकारात प्रतिकांचा उपयोग केला जातो. जसे, छांदोग्य व बृहदारण्यक उपनिषदात 'पंचाग्नी विद्या' असे एक प्रकरण आले आहे. यात पृथ्वीरूपा अग्निविद्या, पर्जन्यरूपा अग्निविद्या, स्त्रीरूपा अग्निविद्या असे अग्निविद्येचे प्रकार वर्णन करण्यात आले आहेत. वस्तुतः पृथ्वी, पर्जन्य, स्त्री हा काही अग्नी नव्हे. परंतु तो अग्नी आहे अशी मानसिक भावना करून त्यात तत्त्वांची उपासना करणे हेच अवस्तुभावन वा अतत्त्वभावना होय."[१०७] यात एखाद्या वस्तुच्या ठायी दुसऱ्या वस्तुची कल्पना करून उपासना केली जाते.

२. उत्कर्षबुद्धी - भारतीय संस्कृतीमध्ये मानवी जीवनाच्या उद्दिष्टात अभ्युदयाचाही समावेश केला आहे. अभ्युदय म्हणजे इहलौकिक उन्नती. मानवाला अनेक प्रकारची सामर्थ्ये प्राप्त व्हावीत असे वाटत असते. यासाठी विश्वातील विविध शक्तींची उपासना केली जाते. सूर्याची उपासना, चंद्राची उपासना, पंचमहाभूतांची उपासना, ग्रह व देवतांची उपासना अशा विविध उपासना यात समाविष्ट होतात. उत्कर्षासाठी केलेली उपासना म्हणजे उत्कर्षबुद्धी होय. **'यादृषी भावना यस्य सिद्धिर्भवतितादृषी** या नियमाप्रमाणे जशी भावना केली जाते तसे फळ प्राप्त होते. हा नियम उत्कर्ष बुद्धीस लागू पडतो.

३. तदाकारकरण - तदाकार म्हणजे त्याचा आकार. अर्थात् भक्त ज्या दैवताची उपासना करतो त्याच्याशी एकरूप होणे. सनातन भारतीय धर्मानुसार परमेश्वराचे अंतिम स्वरूप परब्रह्म परमात्मा हेच मानले जाते. त्यानुसार प्रत्येक दैवत हे परब्रह्मरूपच आहे. या परब्रह्मस्वरूपाची एकरूप होण्यासाठी केलेली उपासना म्हणजे 'तदाकारकरण' होय. या प्रक्रियेत उपासक भक्त आणि उपास्य दैवत यात एक प्रकारचे अद्वैत प्रस्थापित होते.

हे ज्ञानपूर्व भक्तीचे प्रकार होत. ज्ञानपूर्व भक्ती ही द्वैतावर आधारलेली असून ती सगुण स्वरूपाचीच असते. ही भक्ती परमेश्वराला सगुण साकार रूपात पाहून त्याच्याशी माय, बाप, सखा असे कोणते ना कोणते नाते जोडून करावयाची असते. यात भक्त आणि त्याचे उपास्य दैवत यात प्रेमभाव असला तरी अद्वैतभाव नसतो. भक्तिची ही प्राथमिक अवस्था असते. ही भूमिका गुलाबराव महाराजांच्या अभंगांतून अनेक जागी स्पष्ट झाली आहे.

**देव सुंदर सुंदर । आवडतो निरंतर ।।**
**देव सज्जन सज्जन । त्याचे पायी जडो मन ।।**
**देव समर्थ समर्थ । पुरवी दुर्बळांची आर्त ।।**
**देव आई देव आई । कृपावंत दुजा नाही ।।**
**देव बाप देव बाप । निवारितो तिन्ही ताप ।।**
**देव सद्‌गुरु सद्‌गुरु । सखा स्वामी ज्ञानेश्वरू ।।**[१०८]

याप्रमाणे देवाशी गुरूचे, आईचे, बापाचे असे नाते जोडून त्याच्याशी द्वैतभावाची उपासना जोडता येते. हीच 'ज्ञानपूर्व' भक्ती होय.

**ज्ञानोत्तर भक्ती :**

परमेश्वराच्या स्वरूपाचे ज्ञान झाल्यानंतर म्हणजेच साध्य प्राप्त झाल्यानंतर सिद्धावस्थेतही भक्ताकडून परमेश्वराची सेवा होऊ शकते. हीच 'ज्ञानोत्तर भक्ती' होय. म्हणजेच अद्वैतानुभूती आल्यानंतर जी भक्ती घडते तीच 'ज्ञानोत्तर भक्ती' होय. या भक्तिचे खालील दोन प्रकार होतात.

१. **अपराभक्ती** - या भक्तीत भक्ताला परमेश्वराचे ज्ञान झाले असले तरीही ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी कायम असते. म्हणजेच उपासक भक्त व उपास्य दैवत यातील द्वैतबुद्धी नष्ट झालेली नसते. द्वैताच्या अवस्थेत केलेली उपासना म्हणजेच 'अपराभक्ती' होय.



२. **पराभक्ती** - या भक्तीत परमेश्वर व भक्त यातील अद्वैतानुभव कायम राहून भक्त परमेश्वराच्या सेवेचा आनंद घेत असतो. 'आनंदाचे डोही आनंद तरंग' असे या भक्तीच्या अनुभवाचे स्वरूप तुकाराम महाराजांनी वर्णन केले आहे. हीच 'पराभक्ती' होय.

मुंडक उपनिषदात विद्येचे अपरा आणि परा असे दोन प्रकार स्पष्ट करण्यात आले आहेत. तेथे म्हटले आहे - **'द्वे विद्ये वेदितव्ये परा चअपरा च'** अर्थात् विद्येचे परा व अपरा असे दोन प्रकार पडतात. विद्येचे हे प्रकार म्हणजेच भक्तिचे प्रकार होत. कारण भक्ती ही विद्याच आहे. भक्तिचे उद्दिष्ट आनंद हेच आहे. देहपिंडाच्या रचनेतील अंतिम कोष हा आनंदमय कोष आहे. हा आनंद विविध स्तरावरचा असू शकतो. तैत्तिरीय उपनिषदात आनंदाचे विविध स्तर वर्णन करण्यात आले असून मानवी आनंदापासून ते प्रजापतीच्या आनंदाचे उत्तरोत्तर श्रेष्ठ स्तर पूर्वीच्या स्तरापेक्षा शतपटीने गुणित असल्याचे स्पष्ट करण्यात आले आहे.

भक्तिचे ज्ञानपूर्व आणि ज्ञानोत्तर असे दोन मुख्य प्रकार पाहिल्यानंतर ज्ञानपूर्व भक्तिचे सविस्तर विवेचन करणे आवश्यक ठरते.

**ज्ञानपूर्व भक्तीचे प्रकार :**

भक्तीचे अंतिम उद्दिष्ट हे आंनदच आहे. हे उद्दिष्ट गृहीत धरून भक्तीच्या सोळा प्रकारांचे वर्णन गुलाबराव महाराजांनी केले आहे. हे प्रकार बाजूच्या पानावरील आकृतीत स्पष्ट करण्यात आले आहेत. गुलाबराव महाराजांचा हा विचार भागवतातील विचाराला समांतर असा आहे. श्रीमद्‌भागवतात भक्त प्रह्लादाने म्हटले आहे -

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ।।**[१०९]

वस्तुतः हे भक्तिचे प्रकारच आहेत.

'भगवान् विष्णूचे नाव, रूप, गुण आणि प्रभाव वगैरेंचे श्रवण, कीर्तन आणि स्मरण व भगवंताची चरणसेवा, पूजन आणि वंदन तसेच भगवंताच्या ठिकाणी दास्यभाव, सखाभाव आणि आत्मसमर्पण अशी नऊ प्रकारची भक्ती आहे.'

अशा प्रकारे शास्त्रात भक्तिची निरनिराळी अनेक लक्षणे सांगितलेली आहेत. परंतु विचार केल्यास असे दिसते की, सिद्धांतात काही फरक नाही. सगळ्यांचे तात्पर्य एकच आहे की, स्वामी ज्या भावाने आणि आचरणाने संतुष्ट होत असेल, तसा भाव ठेवून त्यांच्या आज्ञेनुसार आचरण करणे म्हणजेच 'भक्ती'.

श्रीमद्भागवतात प्रह्लादाच्या नवविधा भक्तिविषयी त्याचे स्वरूप, विधी, प्रयोजन, हेतू, फळ, आणि उदाहरणाचे दिग्दर्शन केले आहे. वरील नवविधा भक्तिमधून एकीचे जरी चांगल्या प्रकारे अनुष्ठान केले, तर परमपद प्राप्त होते. मग नऊंचे नीट अनुष्ठान करणाऱ्याविषयी तर बोलायलाच नको.

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी भक्तिचे सोळा प्रकार सांगितले आहे. भक्तीच्या या सोळा प्रकारांचे विवेचन येथे संक्षिप्तपणे करण्यात येत आहे. हे सर्व प्रकार वरील ज्ञानपूर्व आणि ज्ञानोत्तर या प्रकारात मोडतात. यातील श्रवण, मनन, कीर्तन, स्मरण इत्यादी भक्तिप्रकारांचे स्पष्टीकरण येथे करण्यात आले आहे.



### १. श्रवण भक्ती

भगवंतांच्या प्रेमळ भक्तींनी सांगितलेल्या भगवंताच्या, नाम, रूप, गुण, प्रभाव, लीला, तत्त्व, आणि रहस्याच्या अमृततुल्य कथांचे श्रवण श्रद्धेने आणि प्रेमाने करीत असताना, जसे वीणा ऐकून हरिण मुग्ध होते तसे प्रेममुग्ध होणे, हे श्रवण भक्तिचेच रूप आहे.

वरील श्रवणभक्तीच्या प्राप्तीसाठी श्रद्धा आणि प्रेमाने महापुरुषांना साष्टांग दंडवत, त्यांची सेवा आणि निष्कपटपणे त्यांना प्रश्न विचारून त्यांनी सांगितल्याप्रमाणे आचरण करण्याचा सदैव निरलस प्रयत्न करावयास हवा.

नारदाने श्रीमद्भागवतमहात्म्यात सनकादिकांना सांगितले आहे -

**श्रवणं सर्वधर्मेभ्यो वरं मन्ये तपोधनाः ।**
**वैकुण्ठस्थो यतः कृष्णः श्रवणाद् यस्य लभ्यते ।।**[११०]

'हे तपोधन हो ! मी भगवंताच्या गुणानुवादांचे श्रवण करणे सर्व धर्मांहून श्रेष्ठ समजतो. कारण भगवंताचे गुणानुवाद ऐकल्याने वैकुंठवासी भगवंताची प्राप्ती होते.'

म्हणून आपले सगळे आयुष्य महापुरुषांच्या संगतीत घालवून भगवंताचे नाव, रूप, गुण, प्रेम, प्रभाव, लीला, धाम, रहस्य आणि तत्त्वाच्या अमृतासमान गोष्टी सतत ऐकावयास हव्यात आणि त्या ऐकता-ऐकता प्रेमानन्दात बुडून जाऊन मनुष्यजीवन सफळ करावयास हवे.

### २. संकीर्तन भक्ती

भगवंताचे नाव, रूप, प्रभाव, चरित्र, तत्त्व, आणि रहस्याचा श्रद्धेने आणि प्रेमाने उच्चार करीत करीत शरीरात रोमांच, गहिवर, अश्रुपात, हृदयाची

प्रसन्नता, मुग्धता आदि अविर्भाव होणे, कीर्तन भक्तिचे स्वरूप आहे.

कथा, व्याख्यान वगैरे द्वारा भक्तांसमोर भगवंताच्या प्रेमभावाचे कथन करणे, एकांतात किंवा समूहात भगवंत प्रत्यक्ष समोर हजर आहेत, असे समजून त्यांच्या नावाचा जप करणे आणि सस्वर कीर्तन करणे, भगवंताचे गुण, प्रभाव आणि चरित्र वगैरेंचे श्रद्धेने आणि प्रेमाने, हळू-हळू किंवा उच्च स्वरात, उभे राहून किंवा बसून वाद्यवृंदासहित किंवा विरहित नामस्मरण करणे, तसेच दिव्य स्तोत्र आणि पदांद्वारा भगवंताची स्तुती करणे, प्रार्थना करणे इत्यादी कीर्तन-भक्ती करण्याचाच एक प्रकार आहे.

कीर्तन-भक्तीसुद्धा ईश्वर आणि महापुरुषांच्या कृपेमुळेच प्राप्त होते. म्हणून यासाठी त्यांची कृपा असावयास हवी. कारण भगवंताच्या भक्तांद्वारा भगवंतांचे प्रेम, प्रभाव, तत्त्व आणि रहस्याच्या गोष्टी ऐकून तसेच शास्त्रपठन केल्याने भगवंतांच्या ठिकाणी श्रद्धा जडते. आणि मग मनुष्य वरील कीर्तनभक्ती मिळवू शकतो. म्हणून भगवंत आणि त्यांच्या भक्तांची कृपा मिळविण्यासाठी त्यांच्या आज्ञेचे पालन करावयास हवे.

भागवत आणि रामायण वगैरे सर्व प्रकारच्या भक्तिग्रंथांमध्ये भगवंताच्या केवळ नामस्मरणाने आणि गुणकीर्तनाने सर्व पापांचा नाश आणि भगवत्प्राप्ती सांगितली आहे. श्रीमद्‌भागवतात म्हटले आहे -

**ब्रह्मघ्नो पितृघ्नो गोघ्नो मातृऽऽचार्यघ्वान् ।**
**श्वादः पुल्कसको वापि शुद्ध्येरन् यस्य कीर्तनात् ।।**[१११]

'ब्राह्मणघाती, पितृघाती, गोघाती, मातृघाती, गुरुघाती असे पापी तसेच चाण्डाळ आणि म्लेंछ जातीचेसुद्धा कीर्तनाने शुद्ध होतात.'



**सङ्कीर्त्यमानो भगवाननन्तः श्रुतानुभावो व्यसनं हि पुंसाम् ।**
**प्रविश्य चित्तं विधुनोत्यशेषं यथा तमोऽर्कोऽभ्रमिवातिवातः ।।**[११२]

'ज्याप्रमाणे सूर्य अंधःकाराला, प्रचंड वायू ढगांना छिन्न-भिन्न करतो, त्याचप्रमाणे ज्यांचा प्रभाव विख्यात आहे, असे अनन्त भगवान मानव - हृदयात प्रवेश करून सगळ्या पापांचा निःसंदेह समूळ नाश करतात.'

### ३. स्मरण भक्ती

भगवंताचे नाम, रूप, गुण, प्रभाव, लीलातत्त्व आणि रहस्यमय अमृतासमान कथांचे जे श्रद्धेने आणि प्रेमाने आणि पठण केलेले असेल, त्याचे मनन करणे आणि असे मनन करता करता देहाची शुद्ध विसरून भगवंताच्या स्वरूपात ध्रुवाप्रमाणे तल्लीन होऊन जाणे, हे स्मरण-भक्तिचे स्वरूप आहे.

शक्यतोवर एकान्त आणि पवित्र जागी सुखाने साध्या आसनात बसून इंद्रियांना विषयरहित करून कामना आणि संकल्पांचा त्याग करून प्रशांत आणि वैराग्यपूर्ण चित्ताने किंवा उठता-बसता, हिंडता फिरता, खाता-पिता, झोपता-उठता सगळी कामे करतानाही स्वाभाविक शुद्ध आणि सरळ भावाने भगवंतांच्या सगुण-निर्गुण, साकार निराकाराचे तत्त्व समजून गुण आणि प्रभावासहित भगवंताच्या स्वरूपाचे चिन्तन करणे, भगवंताच्या नावाचे मनःपूर्वक स्मरण करणे, भगवंतांच्या लीलेची आठवण करून मुग्ध होणे, भगवंताचे तत्त्व आणि रहस्य समजून त्याच्या गुण प्रभावाचे चिंतन करणे आणि दिव्य स्तोत्र आणि पदांनी मनापासून स्तुती आणि प्रार्थना करणे अशा प्रकारे स्मरणचे अनेक प्रकार शास्त्रात सांगितलेले आहेत. भगवद्‌गीतेत खालीलप्रमाणे म्हटले आहे -

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ।।**
**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**[१०३]

'हे अर्जुना! तू मनःपूर्वक सर्व कर्मे मला अर्पण करून आणि समत्वबुद्धिरूप निष्काम कर्मयोग आचरून माझ्या ठायी सतत चित्त असलेला हो. वरीलप्रमाणे माझ्या ठायी असणारा होऊन माझ्या कृपेने सगळ्या संकटांतून अनायासे पार होशील.'

### ४. पादसेवन भक्ती

जो वज्र, अङ्कुश, ध्वजा आणि कमळ इत्यादी चिह्नांनी युक्त आहे, ज्यांच्या शोभायमान, रक्तवर्ण, उन्नत नखमंडळाची प्रभा भक्तांच्या हृदयातील अंधःकार पूर्णपणे नष्ट करते, अशा श्रीभगवंतांच्या चरणकमलांचे मोठ्या प्रमाने चिंतन करावयास हवे.

ज्यांच्या चरणप्रक्षालनामुळे उत्पन्न झालेल्या पवित्र गंगाजळाला मस्तकावर धारण करून श्रीशिवाने शिवत्व प्राप्त केले आहे आणि जे ध्यान धारणाऱ्या पुरुषाच्या अंतःकरणातील पापरूपी पहाडाच्या बाबतीत इंद्राने सोडलेल्या वज्रासारखे आहेत अर्थात् ज्यांच्या ध्यानाने पापपुंज नष्ट होतात, त्या श्रीभगवंतांच्या चरणकमलांचे चिरकाल चिंतन करावयास हवे.

श्रीभगवंतांच्या दिव्य मंगलमय स्वरूपाची धातू वगैरेची मूर्ती, चित्र, किंवा मानस मूर्तीच्या मनोहर चरणांचे श्रद्धापूर्वक दर्शन, चिंतन, पूजन आणि सेवन करीत करीत भगवत्प्रेमात तन्मय होऊन जाणे, यालाच 'पादसेवन' म्हणतात.

भगवंताच्या चरणामृताचे पान करण्याने आणि त्याला मस्तकावर





धारण केल्यानेही कल्याण होते. भगवान् श्रीरामांचे चरणामृत प्राशन करून त्यांना नौकेतून पैलतीरावर घेऊन जाणाऱ्या नावाड्याचा महिमा संतांनी वर्णन केला आहेच.

### ५. अर्चन भक्ती

जे कोणी या जगात श्रीभगवंताची पूजा-अर्चा करतात, ते श्री भगवंतांच्या अविनाशी आनंदस्वरूप परमपदाप्रत जातात.

भगवंतांच्या भक्तांकडून ऐकलेल्या, शास्त्रात वाचलेल्या, धातू आदिपासून बनविलेली मूर्ती किंवा चित्रात पाहिलेल्या, आपल्या मनाला आवडणाऱ्या कोणत्याही भगवंतांच्या स्वरूपाचे बाह्य सामग्रीने, भगवंतांची आपल्याला आवडणारी मानसिक मूर्ती कल्पून, मानसिक सामग्रीने किंवा सर्वांभूती परमेश्वरास पाहून, सर्वांचा आदर सत्कार करून, यथायोग्य नानाविध उपचारांनी श्रद्धा व भक्तीने त्यांची सेवा - पूजा करणे आणि त्यांचे तत्त्व, रहस्य आणि प्रभाव ध्यानात आणून प्रेममुग्ध होणे म्हणजे 'अर्चन भक्ती' होय.

पत्र, पुष्प, चंदन वगैरे सात्त्विक, पवित्र आणि न्यायोपार्जित द्रव्यांनी भगवंतांच्या प्रतिमेचे श्रद्धेने पूजन करणे; भगवंतांचे प्रेम प्राप्त व्हावे म्हणून शास्त्रोक्त विधीने यज्ञ-याग करणे, सर्वांना भगवंतांचे रूप समजून आपल्या वर्णाश्रमाप्रमाणे त्यांची यथायोग्य सेवा करणे, तसेच सत्कार, मान, पूजा वगैरेंनी संतुष्ट करणे आणि दुःखी, अनाथ, अपंग, पीडित प्राण्यांना भुकेलेल्यांना अन्नाने, तहानलेल्यांना पाण्याने, वस्त्रहीनांना वस्त्राने रोग्यांना औषधी वगैरेंनी, अनाथांना आश्रय देऊन, यथावश्यक, यथाशक्ती, श्रद्धा आणि सत्कारपूर्वक सर्वांना भगवंताचे स्वरूप समजून भगवंताच्या प्राप्तीसाठी सेवा करणे, हे सगळे भगवंतांच्या बाह्य सेवेचे प्रकार आहेत.

शास्त्रात वर्णन केलेल्या, आपल्याला आवडणाऱ्या भगवंताच्या अलौकिक रूप-लावण्ययुक्त, अनन्त-सौंदर्य-माधुर्यमय परम तेजोमण्डित स्वरूपाच्या प्रत्येक अवयवाचे वस्त्राभूषण, आयुध वगैरेंनी युक्त आणि हाता-पायांच्या मंगल चिह्नांसहित मनाने चिन्तन करून आनंदाने मनात आवाहन करून व मनातच स्थापना करून, नानाविध मानसिक सामग्रींनी अत्यंत श्रद्धेने व प्रेमाने पूजन करणे हा मानस पूजेचा प्रकार आहे. भागवतात म्हटले आहे -

**स्वर्गापवर्गयोः पुंसां रसायां भुवि सम्पदाम् ।**
**सर्वासामपि सिद्धीनां मूलं तच्चरणार्चनम् ।।**[११४]

श्रीभगवंतांच्या चरणांचे पूजन-अर्चन करणे, जीवांसाठी स्वर्ग आणि मोक्षाचे तसेच मर्त्यलोक आणि पाताळलोकात असलेल्या सगळ्या संपत्तीचे आणि सिद्धींचेही मूळ आहे.

## ६. वंदन भक्ती

भगवंताचे शास्त्रात वर्णन केलेले स्वरूप, भगवंताचे नाम, भगवंताची धातू वगैरेंची मूर्ती, चित्र किंवा मानसिक मूर्तीला शरीराने किंवा मनाने श्रद्धेने साष्टांग दंडवत करणे किंवा सगळ्या चराचराला, भूतमात्राला परमेश्वराचे स्वरूप समजून श्रद्धेने शरीराने किंवा मनाने प्रणाम करणे आणि त्याचवेळी भगवत्प्रेमाने मुग्ध होणे ही 'वंदनभक्ती' होय. भागवतात म्हटले आहे -

**ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं**
**तीर्थास्पदं शिवविरिन्चिनुतं शरण्यम् ।**
**भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं**
**वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ।।**[११५]



हे पुरुषोत्तमा! हे प्रभो! जे नेहमी ध्यान करण्यायोग्य आहेत, तिरस्कार नाहीसा करणारे आहेत, सगळे मनोरथ पूर्ण करणारे आहेत, जे सगळ्या तीर्थांचा आधार आहेत, ज्यांना शिव आणि ब्रह्मा नमस्कार करतात आणि जे शरणागताचे रक्षण करण्यात प्रवीण आहेत, जे सेवकांची संकटे दूर करतात, नमस्कार करणाऱ्यांचे रक्षक आहेत आणि जे भवसागराचे जहाज आहेत, अशा तुमच्या चरण कमलांना मी वन्दन करतो.

देवाच्या देवळात जाऊन श्रद्धेने आणि भक्तीने भगवंताच्या मूर्तीला साष्टांग दंडवत घालणे, आपापल्या घरात भगवंताची प्रतिमा किंवा चित्र, भगवंताचे नाम, भगवंतांचे चरण आणि चरणपादुकांचे भगवंताचे तत्त्व, रहस्य, प्रेम, प्रभाव आणि भगवंताच्या मधुर लीलांचे ज्यामध्ये वर्णन आहे, अशा सत् शास्त्रांचे आणि सगळ्या चराचर जीवांना भगवंताचे स्वरूप समजून किंवा त्यांच्या हृदयात भगवंतांचा वास समजून विनयाने श्रद्धा-भक्ति-सहित गदगदून प्रणाम करणे, हा वंदनभक्तिचा प्रकार आहे.

**पतितः स्खलितश्चार्तः क्षुत्वा वा विवशे ब्रुवन् ।**
**हरये नम इत्युच्चैर्मुच्यते सर्वपातकात् ।।**[११६]

पतित, स्खलित, आर्त, शिंक आली असता किंवा कुठल्याही प्रकारे परावश झालेला पुरुष सुद्धा जर उच्च स्वरात 'हरये नमः' असे म्हणाला, तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो. भगवंतांचे अनेक भक्त अशा प्रकारे केवळ नमस्कार केल्याने परमपदास प्राप्त झाले.

## ७. दास्य भक्ती

भगवंतांचे गुण, तत्त्व, रहस्य आणि प्रभाव समजून श्रद्धेने त्यांची सेवा करणे आणि त्यांच्या आज्ञेचे पालन करणे 'दास्यभक्ती' आहे.

देवाच्या देवळात काम करणे, झाडलोट करणे, मूर्तीची सेवा करणे, भगवंताच्या स्वरूपाचे मनात ध्यान धरून त्यांची सेवा करणे, सगळ्या विश्वाला, चराचराला भगवंतांचे स्वरूप समजून सर्वांची यथाशक्ती, यथायोग्य सेवा करणे, गीता, वगैरे शास्त्रांना भगवंतांची आज्ञा समजून त्यानुसार आचरण करणे आणि ज्यामुळे भगवंत प्रसन्न होतील, जे भगवंतांना आवडेल, असे काम करणे हे सगळे दास्यभक्तिचे प्रकार आहेत.

भगवंतांचे रहस्य जाणणाऱ्या प्रेमळ भक्तांचा सहवास आणि सेवनाने दास्यभक्ती प्राप्त होते. भगवंतांवर अनन्य प्रेम जडून त्यांची प्राप्ती व्हावी, म्हणून सदैव भगवंतांच्या समीप राहण्याच्या उद्देशाने दास्यभक्ती केली जाते. केवळ या दास्यभक्तीनेही माणसाला अनायासे भगवंतांची प्राप्ती होते.

### ८. सख्य भक्ती

भगवंताचा प्रभाव, तत्त्व, रहस्य आणि महिमा समजून अत्यंत विश्वासाने मित्रभावाने त्यांच्या आवडीप्रमाणे होऊन जाणे, तन्मय होऊन प्रेम करणे आणि त्यांचे गुण, रूप व लीलांवर मुग्ध होऊन नित्य निरन्तर प्रसन्न राहणे 'सख्य भक्ती' आहे. भागवतात म्हटले आहे -

**अहो भाग्यमहो भाग्यं नन्दगोपव्रजौकसाम् ।**
**यन्मित्रं परमानन्दं पूर्णं ब्रह्म सनातनम् ।।**[११७]

त्या नंद गोपांच्या व्रज भूमीत राहणारे लोक धन्य धन्य आहेत. ज्यांचे मित्र परमानन्दपरिपूर्ण सनातन ब्रह्म आहेत.

आपले आवश्यक काम सोडून प्रिय प्रेमीचे काम आदराने करणे, त्याच्या कामासमोर आपले काम तुच्छ समजून बेपर्वा होणे, त्याच्यासाठी खूप परिश्रम करूनही ते थोडेच मानणे, तो ज्यामुळे प्रसन्न होईल ती गोष्ट लक्षात





ठेवून सतत त्यासाठी प्राण असेपर्यंत प्रयत्न करणे, तो जे काही करील त्यात संतुष्ट राहणे, आपली कुठलीही वस्तू त्याच्या कामी आली, तर प्रसन्न होणे, आपल्या शरीरावर आणि आपल्या वस्तूंवर जसा आपला हक्क, आत्मीयता असते, तशीच आपल्या लाडक्या प्रियाचीही समजावी. तसेच त्याच्या शरीरावर आणि वस्तूंवर आपला हक्क, आत्मीयता ठेवावी. आपले धन, जीवन आणि शरीर प्रियाच्या कामी आले, तर त्यात धन्यता मानावी. सतत त्याच्या सहवासात राहावयाची इच्छा ठेवावी, त्याचे दर्शन, भाषण, चिन्तन आणि स्पर्शात रममाण होणे, त्याचे नाम, रूप, गुण आणि चरित्र ऐकून, सांगून, वाचून आणि आठवून अत्यंत प्रसन्न होणे, कुण्या मित्राकडून संदेश मिळताच प्रसन्न होणे आणि त्याच्या वियोगात व्याकुळ होणे आणि क्षणोक्षणी त्याला भेटण्याची आशा करत वाट पाहाणे, वगैरे सख्यभावाचे प्रकार आहेत.

प्रियाला सुख लाभून आपला सख्यभाव पूर्णपणाने वाढावा आणि कधीही त्याचा वियोग होऊ नये, या उद्देशानेच सख्यभक्ती केली जाते.

सख्यभक्तीच्या प्राप्तीसाठी भगवंतांच्या प्रेमळ सख्यांचा संग, सेवा, त्यांच्या जीवनचरित्राचे अध्ययन आणि त्याचे व भगवंताचे गुण, लीला आणि प्रभावाचे त्याच्या प्रेमळ भक्तांकडून श्रवण करावयास हवे.

अशा प्रकारच्या सख्य भक्तीनेही मनुष्याच्या दुःख आणि दोषांचा नाश होऊन भगवंतांची प्राप्ती होते आणि भगवंतांवर प्रेम जडते. शेवटी भगवान त्या प्रेमळ भक्ताच्या अधीन होतो आणि मग त्याला अतिशय आनंद होऊन शांती मिळते.

### ९. आत्मनिवेदन भक्ती

परमात्म्याचे तत्त्व, रहस्य, प्रभाव आणि महिमा समजून निरहंकारी

होऊन आपल्या तन-मन-धन-जनासहित स्वतःला आणि आपल्या सगळ्या कर्मांना श्रद्धा आणि प्रेमाने परमात्म्याला समर्पण करणे म्हणजेच 'आत्मनिवेदन भक्ती' होय. श्रीविष्णुसहस्रनामात म्हटले आहे -

**वासुदेवाश्रयो मर्त्यो वासुदेवपरायणः ।**
**सर्वपापविशुद्धात्मा याति ब्रह्म सनातनम् ।।**[११८]

ज्या माणसाने भगवान् वासुदेवाचा आश्रय घेतला आहे आणि जो तत्परायण आहे, त्याचे अंतःकरण सर्वथैव शुद्ध होते आणि तो सनातन ब्रह्म प्राप्त करतो.

हानी-लाभ, जय-पराजय, यश-अपयश, मान-अपमान, सुख-दुःख, वगैरे जे मिळेल, त्याला भगवंतांनी धाडलेले बक्षीस समजून प्रसन्न राहणे, तन-मन, स्त्री-पुत्र वगैरे सर्वांवर अहंकाररहित ममता, भगवंत यंत्र चालवणारे आहेत आणि मी त्यांच्या हातचे यंत्र आहे, असा निश्चय करून कठपुतळीप्रमाणे भगवंतांच्या इच्छेनुसार सर्व करणे, भगवंतांचे रहस्य आणि प्रभाव समजण्यासाठी त्यांचे नाव, रूप, गुण, लीलांचे श्रवण, मनन, कथन, अध्ययन आणि चिंतनात श्रद्धा आणि भक्तीने मन लावणे, इन्द्रिय, मन, बुद्धी वगैरे सर्वांवर एकमात्र भगवंतांचाच अधिकार समजणे, भगवंताची वस्तूच भगवंतांना अर्पण केली आहे अशी भावना होणे, कुठल्याही प्रकारे भगवंतांची सेवा घडते यात आनंद मानणे, सर्व काही भगवंतांना अर्पण करून, स्वाद, चैन, विलास, आराम, भोग वगैरेंची इच्छा न होणे, सदा-सर्वदा, सगळ्या ठिकाणी भगवंतांचाच अनुभव करणे, भगवंतांच्या इच्छेशिवाय दुसरी कुठलीही वेगळी इच्छा न ठेवणे, भगवंतांच्या भरवशावर सदैव निर्भय, निश्चिंत आणि प्रसन्न राहाणे आणि भगवद्‌भक्ती सोडून मुक्तीचीसुद्धा इच्छा न करणे, वगैरे सर्व या आत्मनिवेदन भक्तिचेच प्रकार आहेत.



याप्रमाणे गौणी भक्तिचे आठ प्रकार गुलाबराव महाराजांनी वर्णन केले आहेत.

**ज्ञानोत्तर भक्तीचे प्रकार :**

ज्ञानोत्तर भक्तीचे खालील दोन प्रकार गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केले आहेत.

१. मध्यमा भक्ती
२. माधुर्य भक्ती

या भक्तिप्रकारांचे संक्षिप्त निरूपण महाराजांच्या विवेचनाला अनुसरून खालीलप्रमाणे करता येईल.

**मध्यमाभक्ती :**

मध्यमाभक्ती ही गौणीभक्तीच्या वरची आणि पराभक्तीच्या पूर्वीची अशी मधली अवस्था आहे म्हणून यास 'मध्यमा भक्ती' असे म्हटले आहे. तिचे प्रकार खालीलप्रमाणे -

**१. ममता समर्पण**

ममता समर्पण हेच 'आत्मनिवेदन' म्हणूनही ओळखले जाते. या प्रकारात माझे म्हणून जे काही आहे त्या सर्वांचे म्हणजे घर-दार, बायका-पोरे, इत्यादी सर्व माझे नसून भगवंताचे आहे ही भावना विकसित केली जाते. असे भगच्चरणी निवेदन करून त्या सर्वांपासून म्हणजे 'माझा - माझा' या षष्ठीप्रत्ययापासून स्वतःची सुटका करून घेणे, हेच 'ममता समर्पण' होय.

बलिराजाने आपले सर्वस्व भगवंताला अर्पण केले. त्या वामनावताराने पहिल्या दोन पावलात पृथ्वी आणि स्वर्ग व्यापून टाकले. याप्रमाणे

बलिराजाने ममता असलेले सर्व पदार्थ भगवंताने हरण केले. त्यामुळे बलिराजाची ममता नाहीशी झाली. हे अर्धे आत्मनिवेदन होय.

**२. अहंता समर्पण :**

हा देखील आत्मनिवेदनाचाच प्रकार आहे. आपण अन्नमय देहाला, 'मी' समजतो, म्हणून अहंता समर्पण करायची असल्यास प्रथम आपला देह भगवदर्पण करायला हवा. देह आणि श्रोत्रादि सर्व इंद्रिये भगवंताचीच आहेत असे समजून त्यांचा उपयोग भगवंतासाठीच केला पाहिजे. नंतर प्राण, मन, बुद्धी आणि शेवटी अहंकार देखील अर्पण झाला पाहिजे. देहापासून बुद्धी, अहंकारापर्यंत सर्व अहंतास्पद पदार्थ अर्पण झाले की शेवटी 'मी' नसून भगवानच आहे असा अनुभव येतो. हेच पूर्ण अहंतेचे पूर्ण समर्पण होय.

**३. लालन व वात्सल्य :**

भगवंताविषयीचा वात्सल्यभाव हा आत्मनिवेदनाचा टप्पा पूर्ण झाला की त्यानंतर विकसित होतो.

आत्मनिवेदन पूर्ण झाले की भक्त भगवंताचे ऐक्य होते. या ऐक्यसमाधीतून भक्त व्युत्थान पावला की अहंवृत्ती उत्पन्न होते. हा अहंवृत्तीवर आरूढ असलेला कोण ? तर ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात - आम्ही हरीचे भूषावयालागी । ऐसा अभिमान वाहती अंगी ।। या ओवीत वर्णिल्याप्रमाणे हरीला भूषविण्यासाठी आम्ही आहोत, अशी प्रेमवृत्ती उत्पन्न होते. हे 'ज्ञानज-तस्यैवाहम्' होय. मी कोणाचा तर भगवंताचा ! अशी 'तस्य एव अहम्' भक्ती असते. 'मी भगवंताचा आहे' असे म्हणण्यात स्वतःकडे लहानपण येते - व मोठेपण भगवंताकडे जाते. भगवान् व श्रीगुरू एकच असल्याने श्रीहरीची किंवा गुरूची भक्ती तो करतो. 'मी त्याचा आहे', असे म्हणताना मातापिता



समजून भगवंतावर प्रेम असते.

त्याला भक्तांचे इतिहास आठवतात की, लालनभक्तीत पंढरीनाथ दामाजीसाठी महार झाला. जनाबाईकरिता दळूं लागला. एकनाथांच्या घरी चंदन उगाळीत असे. प्रह्लादासाठी नृसिंहावतार घेतला. अशाप्रकारे लालनभक्तीत भगवान् भक्ताकरिता सर्व प्रकारचे कष्ट घेतो पण भक्ताला दुःख होऊ देत नाही. हे सारे आठवून भक्ताचे अंतःकरण व्याकूळ होते म्हणून तो भगवंताला आपले बाळ करतो आणि स्वतः आई होऊन सर्व प्रकारे सेवा करतो.

**ज्ञानोत्तर पराभक्ती :**

लालन आणि वात्सल्य या प्रेमाची पूर्णता झाली की बराचसा अभिमान कमी झालेला असतो. अशावेळी 'स एवाहम्' या सामानाधिकरणाने एका पातळीवर येऊन बरोबरीच्या नात्याने भक्त भगवंतावर प्रेम करतो. या 'ज्ञानज स एवाहम्' प्रत्ययाला माधुर्याची जोड दिली की ती माधुर्यभक्ती होते. 'ज्ञानज स एवाहम्' प्रत्ययाचा म्हणजे सोहंकामविकार, सोहंलोभविकार, सोहंक्रोधविकार, वगैरे ज्ञानाभिमानासह उठणाऱ्या विकारांचा नाश करावयाचा असतो.

माधुर्यप्रेमात हे सर्व विकार भगवंताकडे लावले की आपोआप 'ज्ञानज स एवाहम्' प्रत्यय नाहीसा होऊन 'प्रेम स एवाहम्' प्रत्यय माधुर्यप्रेमरूपाने विकसित होतो.

या माधुर्यभक्तीत अतःकरणातील कोणतीही वृत्ती असो, कोणताही विकार असो, तो भगवंताला आलंबन घेऊनच उठतो व सगुण भगवंतालाच अर्पण होतो. पूर्वी जसे दास्यभक्तीत सख्यवृत्ती किंवा लालनादि प्रेमवृत्ती दाबून

टाकाव्या लागत, किंवा वात्सल्यात माधुर्यवृत्ती दाबावी लागत असे, तसे या माधुर्यप्रेमात होत नाही.

एक वृत्ती भगवंताकडे लावायची व दुसरीचा रोध करावयाचा असा अनिष्ट प्रसंग येथे कधीच येत नाही. **भोज्येषु माता शयनेषु रंभा -** या सुभाषितात सांगितल्याप्रमाणे भावनेने स्त्री असलेल्या भक्ताच्या सर्व वृत्ती सगुण श्रीहरीसाठीच उठत असतात. दासी म्हणून, मित्र म्हणून, जेवताना माता म्हणून, पुत्र म्हणून, वगैरे सर्व प्रकारचे प्रेम माधुर्य प्रेमांतर्गतच होऊ शकते. व्यवहारातील सर्व प्रकारच्या संबंधाने उत्पन्न होणारे प्रेम, पत्नीपणा न सोडता, पत्नी पतीवर करू शकते.

त्याप्रमाणे या माधुर्यप्रेमात एक देखील वृत्ती भगवंताला सोडून उत्पन्न होत नाही. हीच माधुर्यप्रेमाची सर्वंकषता, व्यापकता आणि श्रेष्ठता आहे.

याचे प्रकार खालील प्रमाणे आहेत.

**गुप्तसंयोग शृंगार**

भक्त आपल्या हृदयसंपुटात भगवंताचा साक्षात्कार करून घेतो, पण बाहेर मात्र साऱ्या संसारात त्याला दुःख देणारे वैरी दिसतात. कामक्रोधादि सर्व विकार, मन, बुद्धी, अहंकार वगैरे सर्वच त्याच्या भगवत्साक्षात्कारात आड येत असतात. म्हणून या सर्व वैऱ्यांपासून दूर अशा आपल्या हृदयातच तो भगवंताला लपवून ठेवतो. कधी कधी भक्त अहंकार व कामक्रोधादि विकारांना कुटुंब कल्पितो आणि स्वतः परस्त्रीत्व घेऊन जारबुद्धीने भगवंताशी हृदयमंचकावर प्रेमक्रीडा करतो.

**क्रोध माझा भरतार मेल्याला ठेवला दूरी ।**
**मला लागली गोडी म्हणुनी मी हिंडते परद्वारी ।।**





**परपुरुष भोगिला परंतु पाप नाही अंगी ।।धृ.।।**
**बोधाच्या मदनांत सखे ग बाई मी झाली वेडी ।**
**चित्त चांदण्यामध्ये सखे म्या टाकली पलंगडी ।।**[१११]

या पदामध्ये या गुप्त संयोगाचे सुरेख वर्णन आले आहे.

भगवद्भक्ति-सौरभात महाराजांनी रुक्मिणीने जेव्हा भगवंताला पत्रिका पाठविली तेव्हाची तिची प्रेमावस्था वर्णिली आहे.

**स्पष्ट संयोगरूपी माधुर्यभक्ती**

सद्गुरुविश्वासवृत्तीच्या साह्याने आणि कात्यायनी व्रताच्या पूर्तीमुळे भगवान् श्रीकृष्ण साक्षात् पती म्हणून लाभतात. म्हणजे हृदयातील भगवत्साक्षात्कार बाहेर देखील अनुभवला जातो. हाच अन्वयानुभव होय. गुप्तसंयोगशृंगारात असलेला मनाचा संवेग तीव्रतम झाला की, डोळे मिटले तर हृदयात, आणि डोळे उघडले की बाहेर, अशी अंतर्बाह्य सर्वत्र एक भगवंताची सांवळी सुकुमार मूर्तीच अनुभवाला येते, असा हा नित्य संयोग प्राप्त झाला की तोच स्पष्टसंयोगशृंगार होय.

या अंतर्बाह्य सगुणसाक्षात्काराने आपल्या सर्व इंद्रियांचा स्वामी श्रीकृष्ण आहे असाच अनुभव येतो. विषयांचे प्रियपण कृष्ण सौंदर्याने हिरावून घेतले जाते आणि मग सर्व इंद्रिये बाहेर जरी धावली तरी अन्वयेकरून भगवंताकडेच धावतात. व्यतिरेकाने हृदयात आलेला एकदेशीय सगुण साक्षात्कार बाहेर सर्वत्र विस्तार पावतो, व्यापक होतो, सर्व इंद्रिये बाहेर धावली तरी ती सर्व एका गोपिकांच्या पतीलाच अलिंगन देतात.

या प्रेमसोहळ्याचे वर्णन प्रीतिनर्तनातील पाचव्या पदन्यासात बहारीचे आले आहे. गोपीला वाटते, 'आम्ही सर्वस्वी तुझ्या असून आतापर्यंत हे कृष्णा,

तूं आम्हाला कां फसविले?' असे त्या विचारतात आणि रागावतात. हाच प्रणयकलह होय. यात क्रोधाचा आवेश आणतात. पण या अविर्भावातही काय करतात तर श्रीहरीचे चरणच दृढ धरतात. असे हे प्रणयक्रोधाचे निर्वाण पाहून श्रीकृष्ण गोपीचा हात धरून समजावू पाहतात. पण तिचा मान अधिकच वाढतो. त्या मानाचा अर्थ एकच असतो. 'मला आतापर्यंत उपेक्षिले म्हणून आता मी मौन धरते.' पण या मौनामुळे विचित्र प्रसंग ओढावतो. बाहेर भगवत्संयोगात मग्न असलेल्या वृत्ती हृदयात परतून येऊ लागतात. पण तेही गोपीला सहन होत नाही. तिला वाटते, 'आपण भगवंताजवळ विनाकारण मान घेतला.' हाच अपराध तिला टोचू लागतो आणि ती पुनःपुनः मागे वळून श्रीकृष्णाकडे पाहू लागते. तिच्या वृत्ती हृदयात प्रवेशच करीत नाहीत.

**गुप्त विप्रलंभरूपी माधुर्यभक्ती**

गुप्त विप्रलंभ म्हणजे हृदयातील भगन्मूर्तीचा वियोग होणे. रासक्रीडेमध्ये गोपींना किंचित अभिमान झाला. 'आम्हाला भगवान् प्राप्त झाले. आम्ही धन्य झालो.' अशी धन्यता वाटली. म्हणजे भक्तीत रसास्वाद विघ्न आले.

असा गोपींचा सौभगमद नाहीसा करण्यासाठी आणि त्यांच्यावर प्रसाद करण्यासाठी भगवान् त्यांच्या हृदयातच अंतर्धान पावले. गोपींना बाहेरही भगवान् दिसेना आणि हृदयातही दिसेना.

त्यावेळी गोपी म्हणतात - 'तुझ्या स्पष्टसंयोगात तूं आम्हाला दृढ आलिंगन दिले. आम्ही केलेले अनंत अपराध तूं आपल्या पोटी घातले. पण आम्ही मात्र तुझ्याशी प्रणयकलह करून तुला शिणविले' अशा पश्चात्तापामुळे भक्ताच्या सर्व वृत्ती भगवंताकडे एकतान पावतात. त्या प्रेमाच्या अवसरी





व्यापक ब्रह्म चित्तात भरले जाते. पाठी पोटी, आत बाहेर सर्वत्र एका व्यापक ब्रह्माचाच अनुभव येतो. परंतु,

**जे सगुण होते अंतःकरणी । ते लपूं पाहें निर्गुणी ।।**

असा हा सगुणवियोगाचा प्रसंग आला की मग मात्र गोपी व्याकुळ होतात.

**अवघिया वृत्ती ते क्षणी । चमकती साच्या ।।**

गोपींच्या सर्व वृत्ती विकल होऊन जातात. हृदयातील सांवळे ब्रह्म कुठे लपून बसले आहे याचा त्या शोध घेऊ लागतात.

गोपींना धन्यतारूप अभिमान आल्यामुळे तो नष्ट करण्यासाठी भगवान् अंतर्धान पावले. या धन्यतारूपी रसास्वादामुळे गोपींना पुनः देहाभिमान होईल की काय असे भगवंताला भय वाटले. म्हणून त्यांच्यावर प्रसाद करण्यासाठी भगवान् निर्गुणात लपले.

**याचि भये गोविंद । करावया प्रसाद ।**
**निर्गुणी लपे अभेद । होवोनिया ।।**

किंवा भक्तांचा योगक्षेम चालविण्यासाठी म्हणजे गोपींना प्राप्त झालेल्या प्रेमस्थितीचे रक्षण करण्यासाठी म्हणूनच की काय भगवान हृदयसंपुटात लपून उत्कट विरह प्रेमाचे रक्षण करू लागले.

**स्पष्ट विप्रलंभ माधुर्य भक्ती**

अंतर्बाह्य सर्वत्र भगवंताचा वियोग अनुभवायला येणे म्हणजे 'स्पष्ट विप्रलंभ' होय.

**अंतरी बाहेरी उमटे शोक । शोका पाठीपोटी व्रजनायक ।।**

हृदयात जेव्हा भगवान लपला तेव्हा गोपी घाबरी होऊन बाहेर पाहू लागली. परंतु बाहेरही भगवान् दिसेना तेव्हा मात्र विरहानलाने तिची अवस्था बेभान झाली. आत आणि बाहेर वियोगाने शोकाकुल होऊन व्याकुळ झाली. पण -

या शोकापूर्वी भगवंताचा संयोग होता व नंतर देखील संयोगच होणार, म्हणजे शोकाच्या पाठीपोटी व्रजनायक असल्यामुळे तिच्या अनुभवाला आतबाहेर सर्वत्र चेतन ब्रह्मच भासू लागले. सर्व जडभाव नाहीसा झाला. सर्व विश्वात तिला प्रियसखीच दिसू लागल्या.

वृत्तीने सखिमय अवघे देखिले

जडचेतनाचा भेद संपुष्टात आला. गोपी म्हणते 'या साऱ्या जणी शांत दिसतात कारण त्यांना भगवंताचा संयोग असलाच पाहिजे. तेव्हा मात्र ती **मज न दिसे म्हणूनी कोपे ।।'**

अशा 'स-विरह प्रणय कोपाचेनि योगें' ती क्रुद्ध झाली तरी भगवंताच्या आलिंगनाच्या लोभामुळे तिने इतर सख्यांवर प्रेमच स्थापन केले.

वरील विवेचनावरुन प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांच्या भक्तिपर अभंगांविषयी खालील निष्कर्ष मांडता येतात.

१. भक्तिमार्ग हा वैदिक परंपरेत विकसित झाला असून गीता, भागवत इत्यादी ग्रंथांतून त्याचे महत्त्व विशद करण्यात आले. यासच 'नारायणी' अथवा 'पांचरात्र धर्म' असेही म्हटले जाते. या धर्मातील मतानुसार श्रीकृष्णभक्ती ही सर्वश्रेष्ठ भक्ती होय. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचा भक्तिमार्ग देखील हाच मार्ग अनुसरणारा आहे.



२. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचा भक्तिमार्ग हा प्रामुख्याने मधुराभक्ती म्हणून ओळखला जातो. मधुराभक्ती हा भक्तिप्रकार तसा नवीन वाटत असला तरीही तो जुनाच आहे. भागवताच्या रासपंचाध्यायीत आलेले राधाकृष्ण आणि गोपींचे प्रेम ही मधुराभक्तिच होय. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज याच मार्गाचे अनुसरण करणारे आहेत.

३. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांची मधुराभक्ती ही जशी एका बाजूने वैदिक नारायणीय धर्माशी जोडली आहे तशीच ती दुसऱ्या बाजूने तंत्र परंपरेशीही जोडलेली आहे असे म्हणणे वावगे ठरणार नाही. तांत्रिक उपासनेत स्त्री-पुरुष म्हणजेच शक्ती शिवसामरस्यातून अद्वैत साधण्याची प्रात्यक्षिक साधना केली जाते. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांची मधुराभक्ती या मार्गाला जवळची आहे असे दिसून येते.

४. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी वैदिक आणि तांत्रिक भक्तिचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला.

५. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचा भक्तिमार्ग हा भक्ताला प्रकृती मानतो. तर उपास्य दैवत श्रीकृष्ण परमात्मा हेच पुरुषतत्व आहे असे मानले जाते. एक श्रीकृष्ण सोडून सर्व काही प्रकृती आहे अशी भूमिका स्वीकारली म्हणजे स्वतःला स्त्री मानणे भक्ताला अपरिहार्य ठरते. आणि मग स्वतःला श्रीकृष्णाची प्रेयसी मानून भक्तिचा मार्ग चोखाळला जातो. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचे भक्तिचे मानसशास्त्र असेच आहे.

६. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी भक्तीच्या पारंपरिक व्याख्या

म्हणजेच नारद, शांडिल्य, इत्यादी सूत्रकारांनी दिलेल्या व्याख्या अनुसरलेल्या आहेत. तथापि नारदाच्या भक्तीसूत्रातील परमप्रेमस्वरूपा या शब्दाचा अर्थ त्यांनी माधुर्यभक्तिपर लावला आहे.

७. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांच्या मतानुसार भक्ती हा सर्वश्रेष्ठ मार्ग आहे. वेदविद्या ही भक्तिची दासी आहे असे त्यांनी म्हटले आहे. तर, आत्मविद्या ही शहाणपणाची असली तरीही भक्तीच्या अंगणात खेळणारी आहे असेही त्यांनी म्हटले आहे. उपनिषदांची महावाक्ये ही भक्तिपुढे गौणच ठरतात, असे त्यांनी मांडले आहे.

८. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांना भक्तिचे ज्ञानपूर्व भक्ती आणि ज्ञानोत्तर भक्ती असे दोन प्रकार मान्य आहेत. तथापि ज्ञानानंतर भक्तिची अथवा अन्य कर्मांची गरज नाही हे मत त्यांना मान्य नाही. ज्ञानोत्तर अवस्थेतही भक्ती करता येते आणि हीच पराभक्ती होय असे प्रतिपादन त्यांनी केले आहे.

९. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांची भक्ती ही पूज्यपाद आद्यशंकराचार्यांच्या अद्वैत मताला अनुसरणारी आहे. आचार्यांच्या अद्वैत वेदांताला अनुसरत ज्ञानोत्तर भक्तिचा अर्थ प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केला आहे.

१०. भक्तिचे सामान्य प्रकार म्हणजे नवधा भक्ती ही प्रज्ञाचक्षूंनी आवश्यक मानली आहे.

११. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी ज्ञानोत्तर भक्तिचे मध्यमा आणि माधुर्य असे दोन भाग केले आहेत. मध्यमा भक्ती ही गौण असून माधुर्य भक्ती ही श्रेष्ठ मानली आहे. ज्ञानोत्तर पराभक्ती स्त्री भावाने



पुरुषरूपी परमात्म्याशी एकरूप होणे आवश्यक असते. यात गुप्तसंयोग शृंगार आणि स्पष्टसंयोग माधुर्य तसेच गुप्तविप्रलंभ माधुर्य आणि स्पष्ट विप्रलंभ माधुर्य असे प्रकार प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी केले आहेत.

१२. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांच्या भक्तिमार्गात ज्ञानेश्वरांचा भागवत संप्रदाय, ज्ञानेश्वर ज्या मार्गाला अनुसरतात तो आचार्यांचा ज्ञानमार्ग आणि ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा ज्या नाथसंप्रदायातून येते तो तंत्रमार्ग यांचा सुरेख समन्वय साधला गेला आहे.

असे दिसून येते की, प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी भक्तिमार्गाचे प्रतिपादन केले असले तरीही ही भक्ती आचार्यांच्या ज्ञानमार्गाला अनुसरणारी आहे. त्याचप्रमाणे तंत्रमार्गाला अनुसरत शिवशक्ती सामरस्याचे तत्त्व मधुराभक्तीतून साधण्याचा प्रयत्नही त्यांनी केला. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज योगी होते. त्यामुळे योगमार्गाला अनुसरत भक्तिचे अद्वैत साधण्याचाही प्रयत्न यात आला आहे. प्रज्ञाचक्षूंची भक्ती ही स्त्री ची भूमिका धारण करून म्हणजेच परमेश्वराची प्रेयसी होवून परमेश्वराशी एकरूप होऊ पाहणारी पराभक्ती आहे. प्रेममय भक्ती असल्यामुळे साहजिकच प्रेमाचे अधिष्ठान असलेले दैवत म्हणजेच भगवान श्रीकृष्ण हेच त्यांचे प्रमुख दैवत आहे. प्रज्ञाचक्षू स्वतः स्त्रीसारखे राहून कृष्णभक्तिची उपासना करीत असत. ते स्वतःला ज्ञानेश्वरकन्या म्हणवून घेत. याप्रमाणे प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचा भक्तिमार्ग ही ज्ञान, योग, आणि भक्ती यांचा त्रिवेणी संगमच होय.

* * * * * *

# गुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञानपर अभंग

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज यांचे लीलाचरित्र हा एक चमत्कारच म्हणावा लागेल. कुणब्याच्या कुळात झालेला जन्म आणि त्यामुळे परंपरेने लाभलेले शूद्रत्व त्यांना वेदाध्ययनापासून दूर ठेवणारे ठरले. सर्वसामान्य शेतकरी कुटुंबातल्या जन्मामुळे घरी कोणत्याही प्रकारची संस्कृत पांडित्याची, तत्त्वचिंतनाची, साहित्याची वा काव्याची परंपरा नव्हती. अमरावती जिल्ह्यातल्या माधान नावाच्या खेडेगावात शिक्षणाच्या फारशा सोयीदेखील नव्हत्या. ग्रंथालये तर दूरच परंतु एखादे पुस्तक मिळविण्यासाठी सुद्धा महाराजांना कष्ट करावे लागत. त्यातून आर्थिक परिस्थिती देखील बेतास बेत. त्यामुळे पुस्तक खरेदीसाठीदेखील 'भिक्षां देही' करावी लागे. यातच दैवाने परीक्षा पाहावयाची म्हणून ठरविले म्हणून की काय, महाराजांना काही आजारपणाच्या निमित्ताने अंधत्व आले. अशा शारीरिक दुर्बलता, आर्थिक ओढाताण आणि पर्यावरणाची प्रतिकूलता यांच्या बंधनाने बांधलेल्या अवस्थेतही महाराजांनी प्रचंड अध्ययन व प्रचंड लेखन केले. हे त्यांच्या उपलब्ध ग्रंथांवरून सहज कळून येणारे आहे. यावरून असेच म्हणावे लागते की, महाराज म्हणजे कोणी 'योगभ्रष्ट योगी शूचिनां श्रीमतां गेहे' या गीतेतील उक्तीप्रमाणे माधानला कुणब्याच्या कुळात जन्माला आला आणि त्याने आपले उर्वरित कार्य पूर्ण करून देहत्याग केला. महाराजांच्या साहित्यात सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्व-उत्तरमीमांसा ही षड्दर्शने, नारदादी भक्तिसूत्रे, व्यासांचे भागवत इत्यादी आर्ष ग्रंथांवरील त्यांचे भाष्यरूप लिखाण प्रासादिक



ओवीबद्ध शैलीत केलेले दिसून येते. ओवीच्या साहित्य सौंदर्याबरोबरच त्यातून भारतीय तत्त्वज्ञानाचा सूक्ष्म व गंभीर अभ्यास दिसून येतो. महाराजांच्या तत्त्वचिंतनातून पूज्यपाद आद्य शंकराचार्यांच्या वेदांतावर असलेली त्यांची श्रद्धा जागोजाग प्रकट होते. त्यातूनच अनध्यस्त विवर्त या नववेदांती संकल्पनेचा उदय झाला. प्रज्ञाचक्षू भक्तिमार्गी होते. परंतु त्यांची भक्ती ही नुसती टाळकुटेपणाचे द्योतक नसून वेदांताच्या भक्कम पायावर ही भक्ती उभी आहे. त्यातूनच ज्ञानोत्तर भक्तीची मीमांसा महाराजांनी केली. भक्तीचे माधुर्य आणि तत्त्वज्ञानाचे गांभीर्य असा भक्तिवेदांताचा सुरेख संगम महाराजांच्या साहित्यातून आढळून येतो.

प्रस्तुत प्रकरणात महाराजांच्या अभंगाच्या गाथेतील तत्त्वज्ञान विषयक अभंगांचा विचार मांडण्यात आला आहे. यापूर्वी तत्त्वज्ञान म्हणजे काय याकडे एक दृष्टिक्षेप टाकणे आवश्यक ठरते.

'तत्त्वज्ञान' हा शब्द तत्त्वाचे ज्ञान अशा अर्थाचा आहे. इंग्रजी भाषेत यासाठी Philosophy हा शब्द वापरला जात असून यात Philo म्हणजे ज्ञान आणि Sophy म्हणजे शास्त्र, म्हणजेच ज्ञानाचे शास्त्र असा भावार्थ अपेक्षित आहे. Philosophy या ज्ञानशाखेचा उगम पाश्चात्य जगतात ग्रीक देशात झाला. ग्रीक देशासही भारताप्रमाणेच प्राचीन परंपरा आहे. सॉक्रेटीस -प्लेटो - ॲरिस्टॉटल या पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या प्रख्यात गुरु-शिष्य परंपरेपासून सुरू होणाऱ्या प्राचीन चिंतनप्रवाहातूनच पुढे पाश्चात्य तत्त्व ज्ञानाचा विकास झाला. भारतीय तत्त्वज्ञानात 'तत्' हा शब्द परम तत्त्वाचा, परमार्थाचा, परमेश्वराचा निदर्शक समजला जातो. यासच 'आत्मस्वरूप' अथवा 'ब्रह्मस्वरूप' असेही म्हटले जाते. त्यात तत् चे जे ज्ञान तेच तत्त्वज्ञान होय. हे तत्त्वज्ञानच 'तत्त्वमसि' इत्यादी उपनिषदांच्या महावाक्यातून मांडण्यात आले

आहे. महाराजांच्या साहित्यातूनही या महावाक्याचे संदर्भ दिसून येतात. याप्रमाणे भारतीय तत्त्वज्ञानात वेदापासून ते संतवाङ्मयापर्यंत सर्व विद्वानांनी मांडलेल्या विचारांचा समावेश होतो.

या विचारधारातील विविध चिंतनधारांवर प्रकाश टाकणारे महाराजांचे प्रासादिक लिखाण तत्त्वज्ञानाला नवे आयाम प्रदान करणारे आहे.

**वेदांचा मूलाधार :**

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान पूज्यपाद शंकराचार्यांच्या वेदांत विचारावर आधारलेले आहे. वेदांत विचार वेदांवर आधारलेला आहे. त्यामुळे महाराजांचे तत्त्वज्ञानही पर्यायाने वेदावर आधारलेले आहे. भारतीय तत्त्वज्ञानात विविध मतमतांतरे असली तरी जैन, बौद्ध आणि चार्वाक ही तीन दर्शने वगळता सर्वच दर्शने वेदांशी असलेले आपले नाते आवर्जून प्रतिपादन करीत असतात. किंबहुना आपल्याला जे मत मांडावयाचे आहे ते वेदात कसे आहे हे दाखवून देण्यासाठीच विविध भाष्यरचना झालेल्या आहेत. प्रज्ञाचक्षूंचे तत्त्वज्ञानही वेदावर आधारलेले आहे. वेदांची महती वर्णन करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**वेदज्ञानावीण शांत्यादि आचार । पाहोनि साचार भ्रमूं नये ।।१।।**
**प्रत्यक्ष गोविंद बौद्ध अवतार । कारुणिक फार शांतिरूप ।।२।।**
**परी विप्रलिप्सा करूनिया जनी । शून्यचि सांगोनि फसविले ।।३।।**
**शिवेही निर्मिले पाखंड तंत्राते । मोह असुराते पाडावया ।।४।।**
**इतरा जीवांची मग काय कथा । सद्गुणेचि व्यथा वाढविती ।।५।।**
**कपिल कणाद मुनि दयाशीळ । निर्मिती प्रबळ वेद-भिन्न ।।६।।**
**म्हणोनि माउली श्रुति भगवती । आणिकांचे पंथी जाऊ नये ।।७।।**





**श्रुतिवेत्ता म्लेंच्छ धर्मव्याध श्रेष्ठ । कौशिक कनिष्ठ विप्र जरी ।।८।।**
**ज्ञानेश्वरकन्या श्रुतिमातेवीण । न मानी वचन विष्णुचेहि ।।९।।**[१२०]

वेदाचे ज्ञान प्राप्त न करता इतर कोणत्या मार्गाने भ्रमिष्टासारखे फिरू नये. त्याने शांती प्राप्त होणार नाही. खरे पाहता भगवान बुद्धाचा परमकारुणिक अवतार हा विष्णूचाच अवतार आहे. पण शून्यवाद सांगून त्याने इतरांना फसविले. भगवान शिवशंकरानेही तंत्राचे पाखंड निर्माण करून असुरांना मोहात पाडले. मग इतरांची कथा काय सांगावी? कपिलांचे सांख्य, कणादाचे वैशेषिक ही वेदबाह्य दर्शनेच म्हणावी लागतात. श्रुती माऊली म्हणते, वेदाचा मार्ग सोडून इतर मार्गावर जाऊ नये. वेद जाणणारा म्लेंच्छ असला तरी तो श्रेष्ठ होय आणि वेद न जाणणारा ब्राह्मण जरी असला तरी तो कनिष्ठ होय.

प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी वेदप्रामाण्याचा उद्घोष जागोजाग केला आहे. वेदातील सूक्तांचा उपयोगही ते आपल्या अभंगांतून मोठ्या कौशल्याने करतात. पुरुषसूक्तातील वचने वापरून रचलेला खालील अभंग महाराजांच्या वेदप्रामाण्यावरील निष्ठेची साक्ष देणारा आहे. महाराज म्हणतात-

**"एतावानस्य महिमा" । ऐसे बोलणे निगमा ।।१।।**
**एक्या सगुण कारण । भक्ती लावावया जन ।।२।।**
**"अतो ज्यायांश्च पुरुष" । हाचि निर्गुण-निर्देश ।।३।।**
**श्रुति दोहीपरी बोले । ज्ञानेश्वरे ऐक्य केले ।।४।।**[१२१]

या अभंगाला ऋग्वेदातील पुरुषसूक्तात आलेल्या खालील ऋचेचा संदर्भ अभिप्रेत आहे.

**एतावानस्य महिमाऽतो जायाँश्चपुरुषः ।**
**ततो विश्वङ्‌गव्यत्क्रामत साशनानने अभि ।।**

अर्थात् -

विराट पुरुषाने हे संपूर्ण विश्व त्यातील साशन (Organic) आणि अनशन (In-organic) अशी सर्व सृष्टी व्यापली आहे, असे वर्णन पुरुषसूक्तात आले आहे. याचा संदर्भ देत महाराज म्हणतात की, वेदाने या सूक्तात परमपुरुषाच्या सगुण तसेच निर्गुण अशा दोन्ही रूपांचे वर्णन केले आहे.

तात्पर्य हेच की, सगुण भक्तिमार्गी उपासना आणि शांकरवेदांताची निर्गुण उपासना या दोन्ही उपासना वैदिकच आहेत.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षूंचे तत्त्वज्ञान हे भक्तिमार्गी असले तरी वेदांचा आधार मान्य करणारे आहे. वेद हेच सर्व ज्ञानाचे मूळ आहे जे वैदिक आहे ते स्वीकारावे, जे अवैदिक आहे ते नाकारावे अशी महाराजांची भूमिका दिसून येते.

**शांकरवेदांताची परंपरा :**

मध्ययुगातील भक्तिमार्गाचा प्रसार-प्रचार करणाऱ्या संत मंडळाने आपल्या भक्तिमार्गी तत्त्वज्ञानाचे मूळ पूज्यपाद शंकराचार्यांच्या वेदांतविचारात शोधण्याचा प्रयत्न केला आहे. प्रत्येकजण आपला दुवा या ना त्या मार्गाने आचार्यांशी जोडू इच्छितो. आचार्यांच्या पलीकडे जाऊन अथवा आचार्यांच्या विरोधात जाऊन कुठेही काहीही बोलण्याची अथवा लिहिण्याची संतमंडळाची तयारी नाही, असे दिसून येते. भागवत धर्माचे प्रवर्तक ज्ञानेश्वर महाराज हे देखील आपली ज्ञानेश्वरी आपण 'भाष्यकाराते वाट पुसतु' लिहिली आहे असा दावा करतात. प्रज्ञाचक्षूंचे तत्त्वज्ञानही आचार्यांना अनुसरणारे आहे. हा





दुवा अधिक स्पष्ट करीत डॉ. वा. ना. पंडित म्हणतात -

"आमच्या मते श्रीज्ञानेश्वर महाराजांचे तत्त्वज्ञान संपूर्णतः शंकराचार्यांचेच तत्त्वज्ञान असून, भक्तीच्या दृष्टीने आचार्यापेक्षा विशेष आहे. भक्ती व ज्ञान या वृत्तीच्या दृष्टीने फरक आहे. हा फरक पाहण्यापूर्वी, श्री ज्ञानेश्वर महाराजांचे तत्त्वज्ञान व शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान एकच आहे की काय याचा विचार करण्याकरिता आपण --- आक्षेपांचा विचार करू. सर्वात जास्त आक्षेप पांडुरंग शर्मांनी घेतले आहेत त्यामुळे त्यांचे आक्षेपात सर्व आक्षेपकांचे आक्षेप सामावून जातात."

पांडुरंग शर्मांचे आक्षेप काय होते? आणि ते बरोबर होते की चूक याची चर्चा करणे हा प्रस्तुत प्रबंधाचा विषय नाही. येथे फक्त पूज्यपाद आचार्यांचे तत्त्वज्ञान आणि ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान यातील दुवा स्पष्ट करून तोच दुवा महाराजांच्या तत्त्वज्ञानाशी जोडलेला आहे, एवढेच दाखवून द्यावयाचे आहे. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज म्हणतात -

**स्वरूपाचा विसर । पातक हो हेचि थोर ।।१।।**
**रज्जूवरी सर्पाभास । नाही औषधीच त्यास ।।२।।**
**तया उजेडचि नाशी । तैसे ज्ञान अविद्येसी ।।३।।**
**ज्ञानेश्वरवाक्य लीला । अवघ्या गुंफी चिन्मणि-माळा ।।४।।**[१११]

आत्मस्वरूपाचा विसर पडणे हे सर्वात मोठे पातक आहे. रज्जुवर सर्पाचा भास व्हावा म्हणजे दोरीच्या जागी साप दिसावा तसे सामान्य माणूस देह हाच आत्मा आहे असे समजून बसतो. अज्ञानामुळे भासणारा हा सर्प ज्ञानाच्या प्रकाशातच लय पावतो. ज्ञानाने अज्ञानाचा नाश होतो. विद्येनेच अविद्या दूर होते.

हाच विषय अधिक स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**निज अहंकारे स्वरूपविस्मृति । मग कोणाप्रती दोष देणे ।।१।।**
**आपण आपले चोरोनि ठेवावे । बळें पुसो जावे दुजियासी ।।२।।**
**तुमचिया घरी आहे काय धन । थोरासी लांछन पुसणे हे ।।३।।**
**तैसे आत्मज्ञान स्वये लोपविले । देवा मागितले कृपाबळ ।।४।।**[१२३]

आपल्याच अहंकारामुळे स्वरूप विस्मृती होते. सामान्य अज्ञानी माणूस अहंकारापोटी आत्मस्वरूप विसरून देह हाच आत्मा आहे असे मानू लागतो. याचा दोष कोणाला द्यावा ? असे होणे म्हणजे आपण स्वतःलाच चोरून ठेवून इतरांना मी कोठे आहे असे विचारत शोध घेण्यासारखे आहे. आपले आत्मज्ञान आपण विसरावे आणि देवाकडे कृपा मागावी हे म्हणजे काल्पनिक रणामध्ये शत्रूला मारण्यासारखे आहे. परंतु जो भगवंताचा दास आहे त्याला मात्र आत्मविस्मृती होत नाही असे भागवतात म्हटले आहे. म्हणून भक्तिमार्गाची कास धरावी.

पूज्यपाद शंकराचार्यांचा वेदांत विचार त्यांचे आजेगुरू गौडपादाचार्यांच्या अजातवादावर आधारलेला आहे. गौडपादांचा अजातवाद हा त्यांच्या मांडुक्य उपनिषदावरील कारिकांमध्ये स्पष्ट झाला असून या कारिकांवर पूज्यपाद आचार्यांचे प्रसन्न गंभीर भाष्य आहे. अजातवादाचा संदर्भ देत प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज म्हणतात -

**अनुभवावीण व्यर्थ शब्दज्ञान । जंव नाही मन ब्रह्ममय ।।१।।**
**शुद्ध मने आधी अशुद्ध मारावे । मग पांगरावे दोहीपणी ।।२।।**
**निवे एकाएकी भववन्हिज्वाळा । होय तळमळा वृत्तिलागी ।।३।।**
**जिज्ञासा पाहतां जिज्ञास्य-संधीत । ब्रह्मांडासहित वृत्ति आटे ।।४।।**





**सकार्य अज्ञान कोणीकडे जाय । अधिष्ठानी राहे ऐसे नाही ।।५।।**
**जेथोनि जयाचा न घडे उद्‌भव । तेथे लयभाव नव्हे त्याचा ।।६।।**
**भिन्न सत्तेमाजी भिन्न सत्ता भेटे । ऐसे नाही कोठे विलोकिले ।।७।।**
**सामान्य चैतन्यी विशेष उपेक्षा । प्रतिभासोपेक्षा सत्ता होती ।।८।।**
**तिचे आज नाही नांव कोठे काही । ज्ञानेश्वर आई करूणेने ।।९।।**[१२४]

अनुभवाशिवाय शब्दज्ञान हे निरर्थक असते. मनच ब्रह्ममय झाले नाही तर शाब्दिक ब्रह्मज्ञानाला अर्थ काय ? शुद्ध चित्ताने अशुद्धतेचा नाश करावा म्हणजेच द्वैताचा निरास आपोआप होतो. या भवसागरातील तापांची शांती होवून भक्तीची तळमळ निर्माण होते. ज्ञाता आणि ज्ञेय एकरूप होऊन आत्मस्वरूप हे विश्वरूप होऊन जाते. अज्ञान हे त्याचे कारण असलेल्या अविद्येसह लय पावते आणि मग केवळ एका परमेश्वराचे अधिष्ठान शिल्लक राहते. तेथे उत्पत्ती, स्थिती आणि लय होण्याचा प्रश्नच उरत नाही. आपण चैतन्याची उपेक्षा करून प्रातिभासिक सत्तेला महत्त्व देतो. पण खरे पाहता ही प्रातिभासिक सत्ता कोठेच दिसून येत नाही.

पूज्यपाद आचार्यांविषयी गौरवोद्‌गार काढत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**सकळ शब्दांचा अर्थ नारायण । रससंभावन गोपिनाथी ।।१।।**
**अविवेक-वर्ज्य विषय भोगिता । दासा-भगवंता भेदू नाही ।।२।।**
**श्रुतिसूत्रभाष्यव्याख्याविवरणी । आचार्यांची वाणी बोलली हे ।।३।।**
**ज्ञानेश्वरस्वामी जीवाचा सांगाती । आधविया हाती विद्या तेणे ।।४।।**[१२५]

सर्व शब्दांचा अर्थ नारायण हाच आहे. तो सर्व रसांचा रस आहे. भक्त आणि भगवंत याच्यात कुठलेही द्वैत नाही. हाच विषय पूज्यपाद आद्य शंकराचार्यांनी श्रुती आणि सूत्रांच्या भाष्यात निरूपण करताना स्पष्ट केले

आहे.

यापमाणे, प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचे मधुराद्वैताचे तत्त्व ज्ञान भक्तिमार्गी असले तरी ते पूज्यपाद शंकराचार्यांच्या अद्वैत वेदांताला अनुसरणारे आहे. ज्ञानोत्तर भक्तीचा आवर्जून आग्रह महाराजांनी घेतला आहे. महाराजांनी दिलेले दृष्टांतही आचार्यांच्या दृष्टांताला समांतर असेच आहेत.

**षड्दर्शनांची पार्श्वभूमी :**

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांच्या तत्त्वज्ञानाला वैदिक षड्दर्शनांची पार्श्वभूमी आहे. कपिलाचे सांख्य, पतंजलीचा योग, गौतमाचे न्याय, कणादाचे वैशेषिक, जैमिनीची पूर्वमीमांसा आणि व्यासांची उत्तरमीमांसा ही सहा दर्शने वैदिक षड्दर्शने म्हणून ओळखली जातात. महाराजांनी या सर्वच दर्शनांवर आपले भाष्य केले आहे. महाराजांचा भक्तिमार्ग हा या षड्दर्शनांच्या पार्श्वभूमीवर आधारलेला आहे. षड्दर्शने आणि महाराजांचे तत्त्वज्ञान यातील दुवा खालील अभंगातून स्पष्ट होतो.

**प्रमाणादि सोळा अर्थ । कणादादिकांचे सप्त ।।१।।**
**जया सत्तेमाजी ठाये । मीमांसका क्रिया सुये ।।२।।**
**सांख्यासी जी द्वैतापत्ति । पतंजलियोगरीती ।।३।।**
**व्यास वर्णिती अद्वैत । तो हा सखा कृष्णनाथ ।।४।।**
**ज्ञानेश्वरप्रभु तात । पुरवील मनोरथ ।।५।।**[१२६]

**'प्रमाणादि सोळा अर्थ'** हे पद न्याय दर्शनाच्या सोळा पदार्थांचा संदर्भ स्पष्ट करणारे आहे. न्याय दर्शनाने प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टांत, सिद्धांत, अवयव, तर्क, छल, जाती, निग्रहस्थान - - - - असे सोळा पदार्थ





मानले आहेत. या पदार्थांचे ज्ञान झाले असता मोक्ष प्राप्त होतो, असे या दर्शनाचे मत आहे.

**'कणकादिकांचे सप्त'** हे पद वैशेषिक दर्शनाच्या सात पदार्थांचा उल्लेख स्पष्ट करणारा आहे. कणादाचे वैशेषिक दर्शन सात पदार्थ मानते. द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय आणि अभाव हे ते सात पदार्थ होत. या सात पदार्थांचे ज्ञान इहलौकिक उन्नती म्हणजे अभ्युदय आणि मोक्ष अर्थात निःश्रेयस प्राप्त करून देणारे आहे, असे या शास्त्राचे मत आहे.

**'मीमांसक क्रिया सुये'** हे पद पूर्वमीमांसेच्या कर्मवादाचे प्रतिपादन करणारे आहे. जैमिनीचे पूर्वमीमांसा दर्शन हे कर्मवादी दर्शन आहे. जोवर जीवात जीव आहे तोपर्यंत मनुष्याने अग्निहोत्रादी कर्म करीत राहिले पाहिजे असे या दर्शनाचे मत आहे. वेदाच्या आज्ञेनुसार कर्म करणे हाच धर्म होय, असे या दर्शनाचे मत आहे.

**'सांख्यासी जी द्वैतापत्ति'** हे पद सांख्य दर्शनाच्या प्रकृतिपुरुष द्वैताचा निर्देश करणारे आहे. सांख्य तत्त्वज्ञान द्वैती आहे. प्रकृती आणि पुरुष ही दोन्ही तत्त्वे अनादी आहेत असे सांख्य मानते.

**'पतंजलियोगरीती'** हे पद पतंजलीच्या योगसूत्राचा निर्देश करणारे आहे. योग ही सांख्य दर्शनातील तत्त्वज्ञानाची प्रत्यक्ष अनुभूती घेण्याची प्रायोगिक पद्धती आहे.

**'व्यास वर्णिती अद्वैत'** हे पद ब्रह्मसूत्राचा निर्देश करणारे आहे. ब्रह्मसूत्र हेच उत्तरमीमांसा दर्शन म्हणून ओळखले जाते. या दर्शनाने अद्वैत वेदांताचे प्रतिपादन केले आहे, असे पूज्यपाद शंकराचार्यांनी आपल्या भाष्यात म्हटले आहे. तोच संदर्भ येथे अभिप्रेत आहे.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी आपल्या तत्त्वज्ञानाच्या मांडणीत सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा अशा सहा दर्शनांचा सखोल विचार केला आहे आणि समन्वयपूर्वक अद्वैत वेदांताचे प्रतिपादन केले आहे.

**श्रुतिवचनांचा मागोवा :**

प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी आपले तत्त्वज्ञान मांडत असताना श्रुती वचनांचा मागोवा जागोजाग घेतला आहे. भारतीय परंपरेत प्रमाणभूत समजल्या गेलेले ग्रंथ म्हणजेच श्रुती आणि स्मृती. श्रुती म्हणजे वेद - ब्राह्मणे - आरण्यके व उपनिषदे हे ग्रंथ होत. तर स्मृती म्हणजे मनु - याज्ञवल्क्य इत्यादिकांच्या स्मृती होत. गीता देखील स्मृतीच समजली जाते. ब्रह्मसूत्र हे दार्शनिक प्रस्थान समजले जाते. श्रुती - स्मृती आणि सूत्र या तिन्हीला मिळून 'प्रस्थानत्रयी' असे म्हटले जाते. ज्याला मोक्षाचे प्रस्थान ठेवावयाचे आहे त्याने या त्रयीचे अध्ययन करावयास हवे, अशी परंपरा आहे.

या परंपरेला स्वीकारल्याचे संकेत प्रज्ञाचक्षूंच्या अभंगांतून अनेक ठिकाणी पहावयास मिळतात. उदा. शुद्ध परमार्थ संकेताच्या अभंगात महाराज म्हणतात -

**सृष्टीपूर्वी एक आत्मा सर्व होता । इतर नव्हता ठाव कोणी ।।१।।**
**स्थावर जंगम नव्हतेचि काही । सत्यत्वेचि पाही एकरूप ।।२।।**
**आत्मा आणि सत्य श्रुति दोन्ही सांगे । एका अर्था लागे ब्रह्मरूपा ।।३।।**
**तयानेचि केले प्रतिभासेक्षण । तेचि अहंपण स्वप्नीचे गा ।।४।।**
**जग व्हावे ऐसा तेथेचि अंकुर । बीज जे साचार ईक्षण की ।।५।।**
**प्रस्थानत्रयाचा एकचि सिद्धार्थ । शुद्ध परमार्थ संकेताचा ।।९।।**



**तो संकेत गुरुकृपे होय सोपा । अनुभव बापा, ऐसा आहे ।।१०।।**[१२७]

या जगताची सृष्टी होण्यापूर्वी आत्मा हा एकटाच होता. त्या एकाशिवाय स्थावर जंगम असे काहीही अस्तित्वात नव्हते. तो आत्माच सत्य स्वरूपाने प्रतिष्ठित होता. जो आत्मा तेच सत्य आणि जे सत्य तेच ब्रह्म. या आत्म्याने आपल्या प्रतिभेने ईक्षण म्हणजे इच्छा केली. हे त्याचे ईक्षण स्वप्नातील अहंभावासारखे होते. जग अस्तित्वात यावे अशी इच्छा त्याने केली. हेच त्याचे ईक्षण. हेच जगाच्या निर्मितीचे बीज होय. प्रकृतीच्या ठायी विश्वनिर्मितीचा गर्भ स्थापन करणारा गर्भदाता हा परमेश्वरच आहे. हा अर्थ श्रुतिसंमत आहे आणि सूत्रातूनही हाच अर्थ प्रतिपादन करण्यात आला आहे.

या अभंगाला ऐतरेय उपनिषदातील 'आत्मा वा इदमेकं एवाग्र आसि - नान्यत्किंचन - सऐक्षत बहुस्याम प्रजायेय ।' मूळारंभी आत्मा हा एकलाच होता. अन्य काहीही नव्हते. त्याने ईक्षण केले की मी बहु व्हावे. या श्रुतिवचनाचा तसेच तैत्तिरिय उपनिषदातील 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' - ब्रह्म हे सत्य अनंतरूप आहे' या श्रुतिवचनाचा संदर्भ अभिप्रेत आहे. तसेच स्मृतीचा दर्जा असलेल्या गीतेतील 'ममयोनिर्महद्ब्रह्म अहंबीजाप्रजापिता:.' महद्ब्रह्म हीच योनी असून या योनीचे ठायी विश्वाचे बीज प्रस्थापित करणारा पिता मीच आहे. तसेच बीजं सर्वभूतानां - सर्व भूतमात्रांचे बीज मीच आहे. या गीतावचनांचा संदर्भही अभिप्रेत आहे.

त्याचप्रमाणे ब्रह्मसूत्रातील जन्माद्यस्य यत: - या विश्वाचा जन्म, स्थिती आणि लय हा त्या परब्रह्मापासूनच होतो, या ब्रह्मसूत्राचा संदर्भ अभिप्रेत आहे.

या प्रमाणे श्रुती, स्मृती आणि सूत्र यांच्या आधारे महाराजांनी आपले

तत्त्वज्ञान मांडले असून या सर्वांचा भावार्थ आपल्या प्रतिपादनातून येईल याची हेतुपूर्वक काळजी त्यांनी घेतलेली आहे, असे दिसून येते.

भागवताच्या मंगलाचरणाच्या अभंगातही महाराजांनी श्रुतिवचनाचा तसेच शांकरभाष्यातील प्रतिपादनाचा आधार घेत परमार्थ सत्याचे निरूपण केले आहे. महाराज म्हणतात -

**जगाची उत्पत्ति स्थिति आणि लय । ज्यापासूनि होय सहजचि ।।१।।**
**व्यतिरेके जो की तटस्थलक्षण । अन्वये करून स्वरूप जो ।।२।।**
**स्वराट् म्हणोनि श्रुति वर्णिताती । विधीते प्रतीति आद्य ज्याची ।।३।।**
**तिन्ही लोक जेथ भासती अन्यथा । मृगजलसत्ता जयापरी ।।४।।**
**निज तेजे जो का मायाविरहित । सत्यज्ञानानंत परब्रह्म ।।५।।**
**मिळोनिया आम्ही करू त्याचे ध्यान । ज्ञानेशवचन मानोनिया ।।६।।**[१२८]

या विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि लय ज्यापासून सहजपणे प्रकट होते ते परब्रह्म अन्वय आणि व्यतिरेक अशा दोन्ही प्रकारे समजून घेता येते. व्यतिरेकाने ते तटस्थ लक्षण आहे. तर अन्वयाने ते स्वरूप लक्षण आहे. ज्याला श्रुती 'स्वराट्' म्हणून म्हणतात, तेच आद्य परब्रह्म होय. त्याच्या ठायी तीनही लोक हे मृगजळाप्रमाणे भासतात. ते परब्रह्ममात्र स्वरूपतेजाने मायावी रहित आहे. ते सत्य, ज्ञान आणि अनंत स्वरूप आहे. येथे पुन्हा तैत्तिरिय उपनिषदातील 'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म' या श्रुतिवचनाचा संदर्भ अभिप्रेत आहे. तैत्तिरिय उपनिषदातच 'स्वः' ही चौथी व्याव्हृति परब्रह्माचा निर्देश करणारी 'स्वराट्' म्हणून म्हटली आहे.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी श्रुतिवचनांचा मागोवा घेऊन विविध श्रुतिवचनांचे संदर्भ आपल्या अभंगात कुशलतेने मांडत श्रुती,



स्मृती, पुराणांच्या आधारे आपले दर्शन मांडले आहे.

**महावाक्याचा क्रम :**

भारतीय तत्त्वज्ञानाची मांडणी करत असताना महावाक्य ही संकल्पना महत्त्वाची ठरते. महावाक्ये म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाचे सार होय. ही महावाक्ये खालीलप्रमाणे आहेत.

**अहं ब्रह्मास्मि -** मी ब्रह्म आहे, हे महावाक्य छांदोग्य उपनिषदात आले आहे.

**तत्त्वमसि -** ते आत्मतत्त्व तूच आहेस, हे महावाक्य छांदोग्य उपनिषदात आले आहे.

**सर्वं खल्विदं ब्रह्म -** हे सर्व चराचर जगत् ब्रह्मच आहे, हे महावाक्य देखील छांदोग्य उपनिषदात आले आहे.

**सत्यं ज्ञानं अनंतं ब्रह्म -** ब्रह्म हे सत्य, ज्ञान व अनंतस्वरूप आहे, हे महावाक्य तैत्तिरिय उपनिषदात आले आहे.

**अयमात्मा ब्रह्म -** आत्मा हेच ब्रह्म आहे, हे महावाक्य मांडुक्य उपनिषदात आले आहे.

**प्रज्ञानं ब्रह्म -** प्रज्ञान हेच ब्रह्म आहे, हे महावाक्य ऐतरेय उपनिषदात आले आहे.

याप्रमाणे उपनिषदातून विविध जागी आलेली ही साररूप वचने महावाक्य म्हणून ओळखली जातात. यातील 'अहं ब्रह्मास्मि' हे वाक्य अहंनिष्ठ (Subjective) वास्तवाचा निर्देश करणारे आहे, 'तत्त्वमसि' हे महावाक्य इदं निष्ठ (Objective) वास्तवाचा निर्देश करणारे आहे, 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हे महावाक्य सार्वत्रिक वास्तवाचा (Omniscient) निर्देश करणारे

आहे.

यापमाणे तत्त्वज्ञानाचे सर्व आयाम महावाक्यांनी निर्देशित होतात. या महावाक्याचा निर्देश करीत महाराज म्हणतात -

**नारायणपाय पहावे हे जरी । वाटते अंतरी दृढ तुझ्या ।।१।।**
**तरी एकवटी सकळ इंद्रिय । अर्पावे हृदय भूतदये ।।२।।**
**सोहंभावे आधी त्वंपद निवडी । मग घाली उडी तल्लक्ष्यांशी ।।३।।**
**ज्ञानेश्वरनामें न उरे वासना । दृश्य तें देखणा स्वयें झाले ।।४।।**[१२९]

परमेश्वराचा साक्षात्कार करून घ्यावा असे जर साधकाला वाटत असेल तर त्याने सर्व भूता ठायी परमेश्वर पाहून सर्व इंद्रिये त्यास अर्पण करावी. सोहं भावाने आधी त्वं पदाचा अभ्यास करावा. आणि मग तत् या पदाचा निर्देश ज्या परमार्थ तत्त्वाने होतो त्याकडे उडी घालावी. हे केवळ ज्ञानेश्वर कृपेने शक्य होते, असे महाराज म्हणतात.

**गीतेचे सार :**

'श्रीमद्भगवद्गीता हा जगाच्या वाङ्मयातील एक तेजस्वी आणि निर्मल हिरा आहे', असे सार्थ उद्गार लोकमान्य टिळकांनी आपल्या गीता रहस्याच्या प्रारंभीच नोंदविले आहे. गीता हे सर्व उपनिषदांचे सार असून गोपाळकृष्ण हाच उपनिषदरूपी गायीचे दोहन करून अर्जुनरूपी वत्साला गीतारूपी दूध पाजविणारा आहे असेही गीता माहात्म्यात म्हटले आहे --

**सर्वोपनिषदो गावो दोग्ध गोपालनंदन ।**
**पार्थो वत्स सुधिर्भोक्ता दुग्धं गीतांमृतं महत् ।।**

याप्रमाणे गीतेचे महत्त्व सर्वांनीच मान्य केलेले असून गीतेचे अनुवाद





आणि भाष्ये जगभराच्या विद्वानांनी केलेली आहेत. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या तत्त्वज्ञानपर अभंगात गीतेचे सार या नावाने ९८४ या स्थळी अभंग १ ते २२ हे गीतेचे सार मांडणारे आहेत. तसे या मथळ्याखाली ९८४ ते १०४५ एवढे अभंग आले आहेत. परंतु त्यात विविध विषयांचा समावेश होतो. गीतेचे सार मांडत प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज म्हणतात -

**सगुण-निर्गुण भावनेचा खेळ । दावितो गोपाळ निजभक्ति ।।१२।।**
**निर्गुणोपासका कष्ट कडसणी । भक्त ते सगुणी लीन होती ।।१३।।**
**त्वंपदशोधन ऐसे सांपडले । पुढे ऐक्य केले एवमिष्ट ।।१४।।**
**प्रकृति-पुरुष व्यष्टि-समष्टीचे । अधिष्ठान साचे ब्रह्म एक ।।१५।।**[१३०]

सगुण आणि निर्गुण अशी परमेश्वराची दोन रूपे हा भावनेचा खेळ आहे. गोपालकृष्णाने आपल्या भक्तांसाठी हा खेळ मांडलेला आहे. निर्गुणाची उपासना करणे अवघड आहे, सगुणाचा अभ्यास सोपा आहे. म्हणून सगुणाचे ठायी भक्त सहजपणे लीन होऊ शकतो. याप्रमाणे 'त्वं' पदाचे ज्ञान झाले की त्यानंतर 'तत्' पदाचे ज्ञान होऊन 'तत्त्वमसि' या महावाक्याचा बोध होतो आणि अद्वैत सिद्धी होते. प्रकृती - पुरुष, व्यष्टी आणि समष्टी असे विविध भेद लय पावून एकमेवाद्वितीय परब्रह्माचा साक्षात्कार होतो. या संपूर्ण चराचराचे अधिष्ठान परब्रह्म हेच आहे, हे समजून येते.

याप्रमाणे गीतेच्या वचनांचा सोपा अनुवाद करीत गीतेचे सार मांडत निष्काम कर्मयोगाचा लोकसंग्रहासाठी उपयोग करण्याचा विचार महाराजांनी मांडला आहे.

**साधना व अभ्यास :**

महावाक्याचा बोध होण्यासाठी साधना आणि अभ्यास महत्त्वाचा

असतो. साधना आणि अभ्यास झाल्याशिवाय मानवाची इहलौकिक तसेच पारलौकिक प्रगती होणे अशक्य असते. अभ्यास म्हणजे योगाची साधना करणे वा तपश्चर्या करणे असे जरी अभिप्रेत असले तरी स्वधर्माचे पालन हाच खरा अभ्यास आहे, असे संतांना अनुसरत महाराजांनी स्पष्ट केले आहे.

स्वधर्म ही संकल्पना गीतेमध्ये खालील श्लोकात आली आहे.

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।।**

परधर्माच्या चांगल्या प्रकारे केलेल्या अनुष्ठानाहून स्वधर्माचे वैगुण्ययुक्त अनुष्ठानही श्रेयस्कर ठरते. स्वधर्मात मरण आले तरी पत्करावे, परंतु परधर्म स्वीकारणे भयावह होय.

सामान्यपणे गीतेतील या वचनाचा अर्थ आपण ज्या हिंदू, मुस्लिम, ख्रिस्ती इ. धर्मात जन्माला आलो तो 'स्व' धर्म सोडून इतरांचा 'पर'धर्म स्वीकारू नये, म्हणजे हिंदू माणसाने वेळ पडली तर मरण पत्करावे पण मुसलमान वा ख्रिश्चन होऊ नये - वा ख्रिश्चनाने हिंदू, मुस्लिम इ. धर्म स्वीकारू नये असा लावला जातो. परंतु नीट विचार करता हा अर्थ चुकीचा आहे असे लक्षात येते.

स्वधर्म म्हणजे आपल्या वर्णाश्रमानुसार वेदांनी निश्चित करून दिलेली कर्तव्ये पालन करणे हाच स्वधर्म होय. असा अर्थ यातून स्पष्ट होतो. हाच अर्थ स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**विहित त्योगोनि केल्या उपासना । न होय वासना क्षय तेणे ।।१।।**
**सत्कारस्वभाव न धरितां मने । तों हरिचिंतन महोत्पात ।।२।।**
**बळेचि मोडितां हरीची वेदाज्ञा । भागवत-संज्ञा विटंबु तो ।।३।।**





**आपुले गृहीची सोडोनि भाकरी । पराचिया घरी क्षीर याची ।।४।।**
**तैसा निजधर्म बळे डावलोनि । परावा सन्मानी रागवशें ।।५।।**
**ज्ञानेश्वरकन्या ऐसियाचे तोंड । मानी जेवी कुंड चर्मकाचे ।।६।।**[१३१]

विहित कर्माचा म्हणजेच वर्ण आणि आश्रम यानुसार अभिप्रेत असलेल्या कर्माचा त्याग करून उपासना केली तर वासना क्षय होत नाही. सत्कार म्हणजे आदर आणि स्वभाव म्हणजे आपली प्रकृती लक्षात न घेता केलेले हरिचिंतन देखील मोठी संकटे उभी करतात, असे महाराज म्हणतात. म्हणून बळे बळेच परमेश्वराची आज्ञा जी वेदात सांगितली आहे ती मोडून म्हणजे, आपापले कर्माचरण सोडून टाळ कुटत बसणे म्हणजे भागवत या नावाला बट्टा लावणे होय. असे करणे हे घरची मीठ भाकरी सोडून दुसऱ्याच्या दारात खिरपुरी मागावयास जाण्यासारखे आहे. म्हणूनच आपला निजधर्म सोडू नये, अर्थात् आपली कर्तव्ये सोडू नये आणि इतरांचा धर्म मोठा चांगला वाटत असला तरी तो स्वीकारावयास जाऊ नये म्हणजे इतरांची कर्तव्ये करीत बसू नये, असे महाराज म्हणतात.

स्वधर्माचे पालन करीत असतानाच अभ्यासही झाला पाहिजे. अभ्यास आणि वैराग्य यांच्या बळानेच चित्तवृत्तींचा निरोध होऊन योग साध्य होतो असे महर्षी पतंजली आपल्या योगसूत्रातही म्हटले आहे. सोहम् जपसाधना ही सोपी आणि उत्कृष्ट साधना आहे. हीच अजपागायत्री म्हणूनही ओळखली जाते. हा विषय स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**कारणोपाधि ती लागली ईश्वरा । कार्याचा पसारा जीवोपाधि ।।१।।**
**कारण ती माया, कार्य ते वासना । जिने ही चेतना गोविलीसे ।।२।।**
**उलटिया बुद्धी वासना सोडिजे । भक्तीने तोडिजे मायाजाळ ।।३।।**[१३२]

परमेश्वर हा निर्गुण निराकार असला तरी, मायोपाधीने त्यास कारणत्व प्राप्त होते आणि जीवनरूप उपाधीच्या आश्रयाने हा कार्यब्रह्माचा पसारा उभा राहतो. माया हे कारण आहे आणि वासना हे कार्य आहे, त्यातच चैतन्य गुंतून राहाते. यासाठी भक्तीचा मार्ग स्वीकारून मायाजाळातून मुक्त व्हावे असे महाराज म्हणतात. महाराजांच्या मते, 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' म्हणजेच वासुदेव नामाच्या जपाने सोहम् योग साधतो. मनुष्य जो श्वासोच्छवास करतो त्यात श्वास आत घेतला गेला म्हणजे 'सो' या अक्षराचा उच्चार होतो. उच्छवासाबरोबर 'हं'या अक्षराचा जप होतो. याप्रमाणे श्वास - उच्छावासाबरोबर सातत्याने 'सोहम् - हंसो - हंसो - सोहम्' असा अखंड जप चालू असतो. या जपावर लक्ष केंद्रित करून आपले दैनंदिन कर्म करीत राहणे ही खरी सोहं साधना आहे, असे योगशास्त्रात म्हटले आहे. हाच उपदेश अभ्यास योग साधण्यासाठी महाराजांनी केला आहे.

अभ्यासाच्या मार्गाने जात असताना वैराग्याची कास धरून आपली आध्यात्मिक पातळी हळूहळू वाढवीत गेली असता साधक हा ध्यान अभ्यासास सक्षम होतो. ध्यानातूनच पुढे समाधी प्राप्त होऊन अद्वैत सिद्धी होते. म्हणून ध्यानाचा अभ्यास महत्त्वाचा ठरतो. तत्त्वज्ञान प्राप्तीसाठी ध्यानाच्या अभ्यासाचे महत्त्व स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज म्हणतात -

**वैराग्यावाचोनि । अभ्यासाने न ये स्थानी ।।१।।**
**गुणवैतृष्ण्य पावला । चिन्मयवृत्ति धांवता ।।२।।**
**धर्माविणे व्यर्थ भक्ति । दंभमाने भोगासक्ति ।।३।।**
**स्वामी आळंदीजीवनु । कृपेवीण सौख्य नाणूं ।।४।।**[१३]

नुसता अभ्यास केला तरी वैराग्य नसल्यास जीवाला आपले स्थान





प्राप्त होत नाही. यासाठी गुणवैतृष्ण्य म्हणजे सत्व, रज, तम या तीन गुणांविषयीची तृष्णा नष्ट होणे आवश्यक असते. ही नष्ट झाली म्हणजे वैराग्य साधते, भगवे वस्त्र पांघरूण नव्हे. भगवे वस्त्र पांघरूण भोगासक्ती तशीच राहिली तरी दंभ वाढतो. धर्मपालनाशिवाय केलेली भक्ती व्यर्थ ठरते. हा उपदेश करीत असताना प्रज्ञाचक्षूंच्या डोळ्यासमोर पतंजलीची योगसूत्रे आहेत, असे निश्चितपणे म्हणता येते.

वृत्तिव्याप्ती आणि फलव्याप्ती ही सारखीच आहे. हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**निर्गुणी सगुणी समाधिस्वरूप । समवृत्ति माप आढळते ।।१।।**
**सास्मित समाधि निरोधाचे वेळी । अहंता निराळी हारपेचि ।।२।।**
**सास्मित रोधितां निवटे आभास । फलव्याप्ति त्यास म्हणू नये ।।३।।**
**वृत्तिव्याप्तियत्न सम भक्तिज्ञानी । एक मुख्यी गौणी एक नाही ।।४।।**
**सकळ सुखाचा आळंदीवल्लभ । विशेष सुलभ प्रेमळाते ।।५।।**[१३४]

निर्गुण समाधी आणि सगुण समाधी यातील वृत्ती एकच असते. सास्मित समाधीचा निरोध होतो तेव्हा अहंता लय पावते आणि सृष्टीचा आभास नष्ट होतो. भक्तिमार्गाने जात असताना वृत्ती आणि फल यांच्या व्याप्तीत भेद राहात नाही. एकाला मुख्य आणि दुसऱ्याला गौण असे म्हणता येत नाही असे प्रज्ञाचक्षूंनी म्हटले आहे.

तत्त्वबोध होण्यासाठी गुरुकृपा आवश्यक असते. सद्गुरु कृपेशिवाय तत्त्वबोध होत नाही. भारतीय परंपरा ही गुरुकृपेची आवश्यकता मांडणारी आहे. हीच परंपरा टिकवीत प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज म्हणतात -

**उजळल्या दाही दिशा । विलोकिता जगदीशा ।।१।।**
**अविद्येचे नाही नांव । देखिलिया गुरुदेव ।।२।।**
**साधनाचे नाही काम । जग आघवेचि राम ।।३।।**
**प्रिय ज्ञानेश्वरस्वामी । विराजे हृदयधामी ।।४।।**[१३५]

गुरुकृपा होताच सर्वत्र प्रकाश होऊन दाही दिशा उजळून जातात. अविद्या मायेचा लोप होऊन हे सर्व चराचर विश्व रामस्वरूप होऊन जाते. अशा अवस्थेत कोणतीही साधना करण्याची गरज राहात नाही. हीच खरी नैष्कर्म्य सिद्धी होय.

अशाप्रकारे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या वेदांतपर अभंगात अद्वैत बोध होऊन तत्त्वसिद्धी होण्यासाठी गुरुकृपेचे साहाय्य घेत अभ्यासाचा मार्ग चोखाळण्याचा उपदेश केला आहे. तथापि, हे करीत असताना आपला स्वधर्म म्हणजे वर्णाश्रमानुसार प्राप्त झालेले कर्तव्य माणसाने केले पाहिजे. कर्तव्य पूर्ण करीत परमेश्वराचे अनुसंधान ठेवणे हीच खरी सोहं साधना होय. हाच तत्त्वज्ञानाचा मार्ग आहे, असे महाराजांचे प्रतिपादन आहे.

**वेदांताचा अन्वयार्थ :**

वेदांत म्हणजे वेदांचा अंत. वेद म्हणजे विशिष्ट ग्रंथ असा अर्थ घेतल्यास वेदाच्या शेवटच्या भागात येणारी परिशिष्टरूपी उपनिषदे म्हणजे वेदांत असा अर्थ प्राप्त होतो. वेदामध्ये कर्मकांडाचे विधान आहे. वेद म्हणजे कर्म हा अर्थ गृहीत धरला तर, वेदांत म्हणजे कर्माचा अंत आणि ज्ञानाचा प्रारंभ असा अर्थ होतो. वेद म्हणजे ज्ञान, परिपूर्ण ज्ञान जेथे होते तेथे ज्ञाता आणि ज्ञेय एकरूप होऊन ज्ञानाची प्रक्रिया थांबते. म्हणून ज्ञानाचा अंत असाही वेदांत या शब्दाचा अर्थ करता येतो.



सामान्यपणे भारतीय परंपरेत वेदांत हा शब्द तत्त्वज्ञानासाठी वापरला जात असला तरी प्रातिनिधिक स्वरूपात वेदांत म्हणजे आद्य शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान या अर्थाने वापरला जातो. तथापि रामानुज वेदांत, मध्ववेदांत असेही शब्दप्रयोग रामानुजांचे विशिष्टाद्वैत आणि मध्वाचार्यांचे द्वैत अशा विविध तत्त्वज्ञानाचा निर्देश करण्यासाठी वेदांत हा शब्द वापरण्यात आला आहे.

वेदांताची एक विशिष्ट प्रक्रिया आहे. ही प्रक्रिया अन्वय व्यतिरेकाच्या तर्कशास्त्रातून सिद्ध होते. श्रुती, स्मृती, युक्ती आणि अनुभव या पायऱ्यातून ती पूर्ण होते. त्यामुळे वेदांत विचार ही घटपटादि खटपटच होय. हा विचार स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**जडचेतनाचा विचार वदनी । हृदयसदनी अविवेक ।।१।।**
**जडचि विषय ओढिती अंतर । उगे शब्दमात्र चिज्जड हे ।।२।।**
**माथां जैसे तैसे पूर्वीचे बंधन । नवे ओझे पूर्ण वेदान्ताचे ।।३।।**
**दोहींचिया भारे दडपला तळी । जाय तो पाताळी कुळासह ।।४।।**[१३६]

तोंडाने जड - चेतनाचे विश्लेषण करणारा शब्दजड विद्वान् अंतःकरणात मात्र अविवेकी असतो. अंतःकरण जडाकडे ओढ घेत असते आणि तोंडाने चैतन्याची भाषा बोलली जाते. त्यामुळे जन्मजन्मांतरीचे बंधन कायम राहून वेदांत विचार हा केवळ ओझे मात्र ठरतो. याप्रमाणे कर्माचे बंधन आणि विचाराचे ओझे या दोहोंच्या पायदळी तुडविला जाणारा दांभिक विचारवंत आपल्या कुळासह नरकात जातो. असा विचार महाराजांनी मांडला आहे.

वेदांत विचार हा अभेदाचे म्हणजेच अद्वैताचे तत्त्वज्ञान मांडणारा आहे. अद्वैत तत्त्वज्ञान प्रामुख्याने आद्य शंकराचार्यांनी मांडले आहे. याच

चिंतनाचा अनुवाद प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या अभंगातून मांडला आहे. महाराज म्हणतात -

**ब्रह्म तेचि जीव, ब्रह्म ते ईश्वर । ब्रह्मचि संसार स्फूर्तिरूपे ।।१।।**
**ब्रह्म शब्द अर्थ आणि ब्रह्मपण । व्यवहार जाण योग्य असे ।।२।।**
**सद्‍गुरूचे वाक्य याहूनि वेगळे । अनुभव बळे घेतां न ये ।।३।।**
**सद्‍गुरुवाक्याचा अनुभव घेतां । हारपे तत्वतां आपणचि ।।४।।**
**ज्ञानेश्वर महिमा पंचक सुंदर । निश्चये साचार पढावे हे ।।५।।**[१३७]

या अभंगात महाराजांनी जीव, जगत् आणि जगदीश्वर या तिघांचे एकत्व प्रतिपादन केले आहेत. ब्रह्म हा शब्द वैदिक साहित्यात वेगवेगळ्या अर्थाने आला आहे. सामान्यपणे पूज्यपाद शंकराचार्यांच्या भाष्यात अंतिम सत्य अथवा परमेश्वर या अर्थाने हा शब्द येतो. तथापि, परब्रह्म आणि परमेश्वर या संज्ञा वेगवेगळ्या अर्थानेही वापरलेल्या आढळून येतात. ईश्वर म्हटले की एखाद्या मूर्तीचे सगुण साकार रूप डोळ्यासमोर उभे राहते तर ब्रह्म म्हटले की निर्गुण निराकार परमेश्वराचे रूप डोळ्यासमोर उभे राहते, संसार म्हणजे हा जगत् प्रपंच आणि जीव म्हणजे पाच भौतिक देहात राहून सुखदुःखाचा अनुभव घेणारा परमेश्वराचा अंश. याप्रमाणे जीव - जगत् - ईश्वर आणि परब्रह्म या सत्तेच्या विविध अवस्था सकृत दर्शनी वेगळ्या दिसून आल्या, त्या वस्तुतः एकच आहेत. हा अद्वैत वेदांताचा महत्त्वाचा मुद्दा येथे साररूपाने मांडण्यात आला आहे. एखादा शब्द, त्याचा अर्थ आणि त्या वस्तूचे असणे म्हणजेच ब्रह्म, ब्रह्मपण आणि अर्थ या व्यवहार दृष्टीने वेगळ्या पाहिल्या जाणाऱ्या बाबी आहेत. सद्‍गुरूचे वाक्य अनुभवाला आले तर आपले अस्तित्वच हरपते असे प्रतिपादन महाराजांनी केले.





### माया समर्पण

'माया' ही अद्वैत वेदांताची आणखी एक महत्त्वाची संकल्पना आहे. या संकल्पनेमुळेच पूज्यपाद आद्य शंकराचार्यांना 'मायावादी' असे म्हटले जाते. मायेचा नाश झाल्याशिवाय परमार्थ वस्तूचे ज्ञान होत नाही, हा वेदांताचा मूलभूत सिद्धांत आहे. माया ही सद्‍सद् विलक्षण अनिर्वचनीय ख्याती आहे, असे आचार्यांनी म्हटले आहे. मायेचे पर्यायवाची शब्द म्हणून अविद्या, प्रकृती, इत्यादी शब्दही वापरले जातात. परंतु तत्त्वज्ञानदृष्ट्या या शब्दांचे अर्थ काहीसे वेगळे आहेत. पूज्यपाद आद्य शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रभाष्याच्या प्रस्तावनेत म्हणजेच अध्यास भाष्यात हा मुद्दा विस्ताराने स्पष्ट केला आहे. हाच मुद्दा अभंगाच्या रूपाने स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**आधी 'आत्मरूपा नाही माया' ऐसी । दृष्टि ते आपैसी उघडावी ।।१।।**
**मग मायाजळी न गुंते हे मन । पावोनि शमन, ब्रह्मी राहे ।।२।।**
**यतीने बायको पुत्रास अर्पिली । तिच्याहूनि गेली ममता तै ।।३।।**
**मग मायाजाळी न गुंते हे मन । नाही मनपण म्हणोनिया ।।४।।**
**तैसी हरिमाया हरीस अर्पिता । मनाची ममता नुरे काही ।।५।।**
**ज्ञानेश्वरप्रभु जेव्हा कृपा करी । तेव्हा हे सिदोरी मुखी पडे ।।६।।**[१३८]

आत्मस्वरूप हे मायेने बांधले जाऊ शकत नाही, ही दृष्टी विकसित झाली पाहिजे. अशी विकसित दृष्टी झाली म्हणजे चित्त हे मायाजाळात गुंतत नाही. ते शम पावून ब्रह्मस्वरूपी स्थित राहाते. माया म्हणजे संन्याशाने आपली बायको मुलाकडे सोपविण्यासारखी अवस्था आहे. तात्पर्य हेच की, संन्याशाला बायको नसते आणि मुलगाही नसतो. परंतु संन्याशाने बायको मुलाला सोपविली असे म्हणण्यात नसलेली वस्तू त्यागण्यासारखे आहे. तसेच हा जगत् प्रपंचही पारमार्थिकदृष्ट्या अस्तित्वात नसलेली माया आहे. हीच हरीमाया आहे. ही

हरीची माया हरीला अर्पिली असता चित्त या जगामध्ये गुंतून पडत नाही.

**रज्जूसर्पाचे उदाहरण**

रज्जुसर्पाचे उदाहरण हे वेदांतात प्राचुर्याने दिले जाणारे उदाहरण आहे. मायेचे स्वरूप समजून देताना सामान्यपणे रज्जुसर्पाचे उदाहरण दिले जाते. अंधाऱ्या जागी पडलेली एखादी दोरी नीट दिसून न आल्यामुळे तो साप असावा अशी समजूत होते आणि साप समजून माणूस घाबरतो वा काठी घेऊन मारावयास धावतो. परंतु प्रकाश येताच तो साप नसून दोरी आहे हे कळून येते आणि मग घाबरण्याची किंवा काठी घेऊन जाण्याची क्रिया घडत नाही. या प्रक्रियेत एका जागी असलेल्या एखाद्या वस्तूचे स्वरूप जसे नाही तसे समजून घेतले जाते. यासच वेदांतात **'अतस्मिन् तत् बुद्धी'** असे म्हणतात. यासच 'अध्यास' असेही म्हटले जाते. हा मुद्दा अधिक स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज म्हणतात -

**रज्जुसर्प नाही मारावासे काही । न होता या ठायी पूर्वीही तो ।।१।।**
**मारणे आणिक भिणे, मिथ्या दोन्ही । आभास म्हणूनि बोधनाश्य ।।२।।**
**अधिष्ठानरज्जु ज्ञानें तन्निवृत्ति । उपाय त्याप्रती दुजा नाही ।।३।।**
**तैसी ब्रह्मज्ञाने अत्यंतचि मुक्ति । ज्ञानेश्वरभक्ति प्रियकर ।।४।।**[१३९]

रज्जुवर दिसून येणारा सर्प हा मुळातच तेथे नसतो. त्यामुळे सर्प मारणे, घाबरणे हे सर्वच मिथ्या ठरते. हा सर्व आभास आत्मबोधाचा नाशक ठरतो. सर्पाचे अधिष्ठान रज्जू हेच असते. तसेच या जगताचे अधिष्ठान परब्रह्म परमेश्वर हेच आहे. ज्ञानाच्या प्रकाशानेच त्याचे खरे स्वरूप समजून येते. हे ज्ञान होताच मुक्ती करतलामलकवत होते. म्हणजेच मुक्तीसाठी शोधाशोध करण्याची गरज राहत नाही.



**अन्वय व्यतिरेक**

वेदांताची प्रक्रिया ही अन्वयव्यतिरेकाची प्रक्रिया आहे. अन्वय म्हणजे जगत् सत्य आहे म्हणून ब्रह्म सत्य आहे असे सकारात्मक (Positive) दृष्टिकोनातून समजून देणे, तर जगत् मिथ्या आहे म्हणून ब्रह्म सत्य आहे असे नकारात्मक (Negative) दृष्टिकोनातून समजून देणे म्हणजे व्यतिरेक होय. अन्वय व्यतिरेकाची प्रक्रिया शांकर वेदांताच्या तत्त्वज्ञानाचा पाया आहे. हा मुद्दा अधिक स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**देहाहूनि आधी व्यतिरेक व्हावा । अन्वये पहावा कृष्ण मग ।।१।।**
**विश्वी नारायण कोंदाटले ध्यान । संपले साधन सर्व काही ।।२।।**
**मग तयालागी भूमीच वैकुंठ । नसे पोट पाठ भेद ब्रह्मी ।।३।।**
**भलीतीही याति हो कां ब्रह्मनिष्ठां । येणे नाही कष्टा संसाराच्या ।।४।।**
**ज्ञानेश्वरप्रभु वचन प्रेमळ । चित्ती घननीळ आत्मप्रभा ।।५।।**[१४०]

सामान्यपणे देह म्हणजे आत्मा अशी समजूत असते. देह हा आत्मा नाही हे समजून घेणे म्हणजे व्यतिरेक होय. देह हा आत्मा नाही हे लक्षात आले म्हणजे त्यापलिकडे असलेले चैतन्यकृष्ण हेच आत्मस्वरूप आहे, हे लक्षात येते. हाच अन्वय होय. याप्रमाणे व्यतिरेकाने जडप्रकृतीचा त्याग घडून अन्वयाने चैतन्याची अनुभूती आली म्हणजे हे चराचर विश्व चैतन्याने ओतप्रोत असल्याची अनुभूती येवून कोणतेही साधन करावयाची गरज राहात नाही. अशा अवस्थेत साधक जेथे असतो ती जागाच वैकुंठ होऊन जाते. तेथे त्याला मागे - पुढे असा काही भेद शिल्लक राहात नाही. सर्वत्र परब्रह्म भरलेले दिसून येते. हीच ब्रह्मनिष्ठा होय. ही ब्रह्मनिष्ठा निर्माण झाली म्हणजे आपोआपच जीव जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्त होतो.

जगत् प्रपंच हा माया असला तरी ते ब्रह्मचैतन्याचे स्फुरणच आहे. अशी अनुभूती परमार्थ ज्ञान झाल्यावर होते. जगत् हे स्फुरणरूप म्हटले तर तो चैतन्याचा ठेवा होऊन मिथ्या राहात नाही. हाच विचार 'चिद्‌विलासवाद' म्हणूनही ओळखला जातो. पूज्यपाद आचार्यांचा मायावाद आणि ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलासवाद ही वेगवेगळी मते आहेत, असा एक वाद मध्यंतरीच्या काळात उभा राहिला होता. या वादाचा सविस्तर परामर्श डॉ. वा. ना. पंडित यांनी घेतला आहे. वस्तुतः मायावाद व चिद्‌विलासवाद या बाबी वेगळ्या नाहीत आणि हाच मुद्दा प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या अभंगांतून वारंवार मांडला आहे. प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**अनुभव तुझा प्रशंसावा वाटे । परी इया वाटे जाणे नोहे ।।१।।**
**जागृति सुषुप्ति स्वप्न आणि तूर्या । अवस्था आदि या ठाव नाही ।।२।।**
**स्फुरण ते रमा अस्फूर्ति तो हरी । ध्यानाचे अंतरी काय काज ।।३।।**
**स्फुरणरूपे त्वां हरिपत्नी व्हावे । अस्फूर्ति होवावे कृष्णरूप ।।४।।**
**आपणचि पत्नी, आपणचि पति । निजनिजांप्रति भोग्यभोक्ता ।।५।।**
**आपणचि स्वामी, आपण सेवक । तरी ना रूपक येणे मग ।।६।।**
**आपणचि देव, आपणचि भक्त । तरी सुख अर्थ सर्वदाचि ।।७।।**
**ज्ञानेश्वरप्रभु हेचि शिकवीत । येर ते समस्त सोडवी की ।।८।।**[१४१]

मनुष्य हा जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुरीय अशा चार अवस्थांमध्ये जाणिवेचा अनुभव घेऊ शकतो. या अवस्थांचे वर्णन पूज्यपाद आद्य शंकराचार्यांनी आपल्या पंचीकरण नामक निबंधात तसेच मांडुक्य कारिकेवरील भाष्यात विस्ताराने केले आहे. जागृतावस्थेत असलेला जीव बहिर्मुख होऊन विश्वरूप होतो, ही अधिभौतिक अवस्था आहे. तर, स्वप्नावस्थेत तो अंतर्मुख होऊन कल्पनारम्य विश्वाचा अनुभव घेतो, ही तेजस - अधिदैविक अवस्था





होय. सुषुप्त अवस्थेत तो अंतर्मुख वा बहिर्मुख न राहता जाणिवशून्य अवस्थेत जातो. या अवस्थेत तो स्व-रूपात स्थित असतो. बृहदारण्यक उपनिषदात या अवस्थेस 'स्वपिती' असे म्हटले आहे. ही अवस्था प्राज्ञ - आध्यात्मिक अवस्था होय. याप्रमाणे जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांपलिकडील अवस्था ही तुरीय होय. यासच भारतीय तत्त्वज्ञानात ओंकाराचे तीन पाद म्हटले आहे. जागृती म्हणजे अ-कार, स्वप्न म्हणजे उ-कार, आणि सुषुप्ती म्हणजे म-कार, तर बिंदू म्हणजे तुरीय असे ओंकाराच्या स्वरूपात या अवस्थांचे प्रकटीकरण केले जाते. हाच मुद्दा प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी वरील अभंगात निर्देशित केला आहे.

स्फुरण हे रमा आहे असे म्हणत प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी सक्रिय अचेतन जड प्रकृतीचा निर्देश केला आहे. तर अस्फूर्ती तो हरी आहे, असे म्हणत त्यांनी साक्षी पुरुषाचा निर्देश केला आहे. म्हणून स्फुरणरूपातील हे जगत् हीच पत्नी होय तर अस्फुरण रूपातील साक्षिभाव हेच कृष्णरूप होय. हे वेगळे म्हटले तरी त्यात द्वैत नाही. भोग्य आणि भोक्ता, स्वामी आणि सेवक, देव आणि भक्त, पती आणि पत्नी या एकाच अस्तित्वाच्या दोन बाजू होत असे दृष्टांत देत महाराजांनी स्पष्ट केले आहे. यामध्ये सांख्य आणि वेदांताचा समन्वय साधण्याचा प्रयत्न महाराजांनी केला आहे.

**तर्काच्या पलिकडचे**

परमार्थ तत्त्वाचे ज्ञान तर्क व युक्तीने होऊ शकत नाही. तर्काची मर्यादा बुद्धीच्या कक्षेपर्यंत असते. बुद्धी हा प्रकृतीचा भाग असतो. म्हणजे एक प्रकारे बुद्धी ही जडच असते. आत्मस्वरूप हे त्यापलिकडचे असल्यामुळे ते तर्कातीत होय. उपनिषदातही हा मुद्दा स्पष्ट करीत **'नैषातर्केणमतिरापनेया'** **'नायमात्मा प्रवचनेन लभ्यो'** - आत्मज्ञान हे तर्कबुद्धीच्या आधारे अथवा

प्रवचनाने होत नाही असे म्हटले आहे. त्यासाठी सद्गुरुकृपेची आवश्यकता असते. हाच मुद्दा स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**नव्हे ब्रह्मज्ञान तर्काचिया योगे । स्वरूपसंयोगे निजचि जे ।।१।।**
**तर्क आपणासी भिन्न वा अभिन्न ? । ज्ञात्या भिन्नभान साधीना धी ।।२।।**
**दुसरिया पक्षात सिद्धसाधन । आपणा आपण केवी साधी ? ।।३।।**
**श्रीकृष्णभजने ज्ञानेश्वरकृपा । झालिया हा सोपा आत्मपंथु ।।४।।**[१४२]

वरील अभंगात हाच मुद्दा प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी स्पष्ट केला आहे. तर्काने ब्रह्मज्ञान होणे शक्य नाही. कारण ब्रह्मस्वरूप म्हणजे आत्मस्वरूप अथवा निजरूपच होय. तर्काने एखादी गोष्ट सिद्ध करण्यासाठी दोन पक्ष लागतात. असे दोन पक्ष केवळ द्वैतातच असतात. अद्वैतात हे पक्ष नसतात. म्हणून सद्गुरुची कृपा हाच आत्मज्ञानाचा राजमार्ग होय.

हाच मुद्दा अधिक स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**तयांसाठी तर्क बोलिले आचार्य । मन तर्कमय झाले ज्यांचे ।।१।।**
**आंत नाही भाव येती तोंडा तोंडा । त्यांसाठी वितंडा आचार्यांची ।।२।।**[१४३]

पूज्यपाद आचार्यांनी तर्काचे प्रतिपादन एवढ्याचसाठी केले आहे की, ज्यांचे मन तर्कमय झाले आहे जे केवळ बुद्धीच्या कक्षेत विचार करतात त्यांची तोंडे बंद करता यावीत. अंतःकरणात भाव नसून केवळ तोंडाने ब्रह्मज्ञान जे सांगतात केवळ त्यांच्यासाठी आचार्यांचा वितंडवाद आहे. ज्याच्या चित्तात प्रेमभाव असतो तो परमेश्वराशी एकरूपच होतो. मग त्याला देहाचा विसर पडतो आणि तो परमेश्वराचे नाव घेत आनंदाने राहतो.



**शुद्ध परमार्थाचे संकेत**

एकत्व हाच शुद्ध परमार्थाचा संकेत आहे. परमार्थ म्हणजे अंतिम तत्त्वाचे ज्ञान. यासच आत्मबोध वा निजबोध म्हटले जाते. असा निजबोध झाला म्हणजे ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी नष्ट होते. मी - तू पणाची भावना शिल्लक राहत नाही. हाच मुद्दा संक्षेपाने स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात-

**आपणासहित सर्व भगवंत । भूतांसी किंचित ठाव नाही ।।१।।**
**भूती भगवंत भगवंती भूते । एक्याचि संकेते पहात जो ।।२।।**
**ज्ञानेश्वर सुत तया प्रकाशिता । भक्त उत्तमार्था सांगतसे ।।३।।**[१४४]

सर्वाभूतीपरमेश्वर पाहणाऱ्या साधकाचा ऐक्यभाव म्हणजेच अद्वैतबुद्धी जागृत होते आणि तो आपल्या अंतःकरणात तसेच बाहेरही सर्वत्र परमेश्वर पाहू लागतो. भूतमात्रांचे ठायी परमेश्वर आणि परमेश्वराच्या ठायी भूतमात्रे असा दिव्य अनुभव त्यास येवू लागतो. हाच वेदांताचा सर्वोत्कृष्ट अर्थ आहे, असे महाराज म्हणतात.

**बोध व मिथ्या जगताचा नाश (त्रिपुटीचा लय)**

असा आत्मबोध उदयास येण्यासाठी त्रिपुटीचा नाश झाला पाहिजे हे स्पष्ट करीत महाराजांनी म्हटले आहे -

**ब्रह्म नोहे नारी नर नपुंसक । अन्वय - व्यतिरेक कळतां कळे ।।१।।**
**विराट् सूत्र ईश कल्पित मायावी । जे भूताद्यभावी अनिर्वाच्य ।।२।।**
**कल्पनेने केले, कल्पनेने जाय । मिथ्या बोधे होय मिथ्या नाश ।।३।।**
**उरला तो माझा आळंदीचा राणा । कालत्रयी जाणा अविनाश ।।४।।**[१४५]

परब्रह्म हे नर, नारी आणि नपुंसक म्हणजेच पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि

नपुंसकलिंग याच्या पलिकडचे म्हणजे अलिंग आहे. हे वास्तव वेदांतातील अन्वय व्यतिरेकाचा अभ्यास केल्याने कळते. विराट् हा सूत्रात्मा हाच हिरण्यगर्भ होय. याची कल्पना मायावी परमेश्वराने केली आहे. हा परमेश्वर अनिर्वचनीय मायेच्या सहाय्याने या विश्वाची निर्मिती करतो. हा सर्व कल्पनेचा खेळ आहे. कल्पनेने याचा जन्म होतो आणि कल्पनेनेच अनुभव येतो. मिथ्याबोधातून होणाऱ्या मिथ्याबोधाचा नाश झाला म्हणजे अविनाशी अशा परमार्थतत्त्वाची अनुभूती येते.

यांप्रमाणे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या अभंगांतून वेदांताचा अन्वयार्थ स्पष्ट करीत आपले तत्त्वज्ञान मांडले आहे. हे करीत असताना त्यांनी पूज्यपाद आद्यशंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेतला आहे. तसेच सद्गुरू ज्ञानेश्वर माऊलींनाही त्यांनी अनुसरले आहे. पूज्यपाद शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर माऊली यांच्या तत्त्वज्ञानाचा पवित्र संगम म्हणजेच प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान होय.

**विश्वात्म स्वरूपाचा साक्षात्कार :**

हे संपूर्ण विश्व म्हणजे परमेश्वररूपी समुद्रावर उठलेले तरंग होत. विश्व सोडून परमेश्वर वेगळा नाही हा विश्वात्मभाव आत्मबोध झाल्यानंतर जागृत होतो. हाच विषय उपनिषदातील महावाक्यातून मांडण्यात आला आहे. ही महावाक्ये पूर्वी चर्चिण्यात आलीच आहेत. यानुसार अहं म्हणजे मी, त्वं म्हणजे तू, आणि सर्वं म्हणजे हे सर्व विश्व एकच आहे असा साक्षात्कार होतो. हाच विश्वात्म साक्षात्कार होय. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या अभंगांतून या ज्ञानोत्तर अवस्थेचा भाव अनेक ठिकाणी प्रकट झाला आहे.





**ज्ञानवृत्ती :**

शिवशक्तीचे एकात्म साधणारी ज्ञानवृत्ती हीच विश्वात्मभावाची अनुभूती देऊ शकते, हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

**अनादि दोघेही उपराधिरहिते । ज्ञानवृत्तियुक्ते तत्त्वरूपे ।।१।।**
**अधिष्ठान भिन्न सत्य ती उपाधि । बोलताती वादी शास्त्रवेत्ते ।।२।।**
**येथे ज्ञानतत्त्व वृत्ति-प्रतिभास । एकाची एकास निरूपाधि ।।३।।**
**तत्त्व ते जनक, वृत्ति ते जननी । शंकर-भवानी विश्वाचे हे ।।४।।**
**विश्वाचे पोषण वृत्तीनेचि होय । म्हणोनिया माय जाहली ते ।।५।।**[१४६]

शिव आणि शक्ती म्हणजेच पुरुष आणि प्रकृती हीच तत्त्व आणि वृत्ती या रूपाने जननी जनक होऊन या विश्वाचे ठायी विलटली आहे. प्रकृती आणि पुरुष हे दोन्ही अनादी आहेत. तत्त्वरूप शिव हा ज्ञानवृत्तीयुक्त असून साक्षीभावाने स्थित असतो. हाच मायेचा आश्रय म्हटला आहे. या ज्ञानरूप आत्म्याहून वेगळी भासणारी, परंतु त्याच्याशी एकच असलेली शक्ती ही जगत् प्रपंचाच्या उपाधिरूपाने अनुभवास येते. यांचे अधिष्ठान भिन्न आहे असे शास्त्रवेत्त्यांनी म्हणजे सांख्य-योग दर्शनाने सांगितले असले तरी त्यात अद्वैतच आहे. विश्वाचे पोषण वृत्तीनेच होते. म्हणून ज्ञानतत्त्व हा वृत्तीचा प्रतिहास आहे असे प्रज्ञाचक्षू म्हणतात. याप्रमाणे प्रकृती पुरुषाचे एकत्व पाहणाऱ्याचे चित्त समाहित होऊन एकत्वाची अनुभूती येते.

**स्वरूप वर्णन**

द्वैताची अनुभूती ही स्वप्नवत असते, हे स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात-

एक वस्तु सत्तासिद्ध । तेथ माया कल्पी भेद ।।१।।
प्रतिबिंब जीव जाणा । बिंब द्वारकेचा राणा ।।२।।
स्वप्नी स्वप्नाचा हा खेळ । स्वर्ग मृत्यु का पाताळ ।।३।।
ज्ञानेश्वरकन्या म्हणे । बोध वेदान्ती पाहाणे ।।४।।[१४७]

सर्वत्र एकमेव आणि अद्वितीय असे परब्रह्म भरलेले आहे तेथे प्रकृति पुरुषाचा भेद हा केवळ मायेनेच कल्पिलेला असतो. यासच बिंब-प्रतिबिंब वादानेही समजून घेता येते. सूर्याचे प्रतिबिंब पाण्यात पडते ते प्रतिबिंब द्वैतभावाने अनेक रूपात असले तरी ती केवळ माया असते. सूर्य हा एकच असतो. तसेच द्वारकेचा राणा श्रीकृष्ण म्हणजेच परमेश्वर, हा बिंबरूप असून जीव हा प्रतिबिंबरूप आहे. हा सारा स्वप्नाचा खेळ आहे. स्वर्ग - मृत्यू व पाताळातील जन्म हा देखील स्वप्नवत् आहेत. हा बोध होण्यासाठी वेदांताचा अभ्यास करावा असे महाराज म्हणतात.

### ज्ञानोदयाची प्रभा

विश्वात्म ज्ञान झाले म्हणजेच एकमेव अद्वितीय परब्रह्माची अनुभूती आली, म्हणजे महावाक्याचा साक्षात्कार घडून जी अवस्था प्राप्त होते, तिचे वर्णन प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी खालील अभंगात केले आहे.

अनिर्वाच्य ब्रह्म अनिर्वाच्य माया । तरी बोलावया ठाव काय ।।१।।
एकाच्या अपेक्षे आन तर्क खोडा । बोधाया रोकडा असमर्थु ।।२।।
गुरुवाक्यश्रद्धा उपजवी वृत्ति । श्रद्धा जडे चित्ती वैराग्याने ।।३।।
अन्योन्याश्रयही वाच्यवाचकाचा । दोषावीण साचा भूषणार्ह ।।४।।
जगन्मिथ्यावृति जाणे अपरोक्षी । आपण तो साक्षी स्वयंसिद्ध ।।५।।
जागृतीत होय हा शब्दानुविद्ध । अन्यावस्थासिद्ध कैसा कीजे ।।६।।
आळंदीवल्लभकरूणा न होता । पुस्तके वाचिता वटवट ।।७।।[१४८]



ब्रह्म आणि माया ही दोन्ही अनिर्वचनीय आहेत. माया ही सद्सद्विलक्षण म्हणजे सत् आहे की असत् आहे हे स्पष्टपणे सांगता न येणारी आहे. म्हणूनच ती शब्दातीत असते. अशा अवस्थेचा बोध तर्काने होऊ शकत नाही. तर्क हा असमर्थ आहे. असा आत्मबोध प्रकट होण्यासाठी गुरुकृपाच आवश्यक असते. गुरुच्या उपदेशाने श्रद्धा उत्तम राहते. श्रद्धा दृढ झाली म्हणजे वैराग्य उत्पन्न होते. या वैराग्यातूनच जगत् मिथ्या असल्याची अनुभूती येत स्वयंसिद्ध आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. यासाठी पुस्तके वाचण्याचा खटाटोप न करता सद्गुरुकृपेचा आश्रय घ्यावा, असे प्रज्ञाचक्षू म्हणतात.

### जीवेश्वरांचा संधी

वस्तुतः आत्मा हा ज्ञानस्वरूप आहे. त्याचा बोध होण्यासाठी केवळ अज्ञान नाहीसे केले पाहिजे. अज्ञान नाहीसे झाले म्हणजे ज्ञानाचा प्रकाश आपोआपच प्रकट होतो. यातूनच जीव आणि ईश्वर यांचे एकत्व अनुभवास येते. हा मुद्दा स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात -

बाहेर हे जेव्हां जाईल रे मन । तेव्हां ती सगुण मूर्ति पाहे ।।१।।
निर्बुजुनी मग येईल हृदयी । आत्मरूप ठायी तेव्हा करी ।।२।।
अंतरी तो आत्मा बाहेरी परमात्मा । तेणे मोडे सीमा मनभाव ।।३।।
जीवेश्वर-संधि सापडल्या मन । नाहीच होऊन राहतसे ।।४।।
पतंजलिशास्त्र वेदान्ताचे सार । सांख्याचा निर्धार तोही येथे ।।५।।
बहु काय संत सांगती जे क्रिया । तेही याच ठाया दाखविती ।।६।।[१४९]

मन जेव्हा बहिर्मुख असते तेव्हा ते सगुण रूपाचे ध्यान करते. ते कंटाळून जेव्हा अंतःकरणात स्थिर होते, तेव्हा आत्मस्वरूपाची अनुभूती घेते.

अंतर्यामी आत्मा आहे तर बाहेर परमात्मा आहे. मन एकाग्र झाले म्हणजे आत-बाहेर ही सीमारेषा मोडते आणि जीव आणि ईश्वराचे एकत्व होऊन मनच नष्ट होते. हीच चित्तवृत्ती निरोधाची अवस्था होय, हे सांख्य, योग आणि वेदांत या दर्शनांचे प्रतिपादन आहे.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या अभंगांतून विश्वात्मभाव व्यक्त होतो. परमेश्वर हा जसा सगुणरूपात साकारलेला आहे तसाच तो निर्गुणरूपातही आहे. त्याचे ज्ञान तर्काने होणे शक्य नाही. केवळ गुरुकृपेनेच हे ज्ञान होऊ शकते.

**भक्तिवेदांताचा उद्‌घोष :**

प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान हे भक्तिमार्गाचा उपदेश करणारे तत्त्वज्ञान आहे. भक्ती हीच अंतिम निष्ठा होय. भक्तीच्या साधनानेच परमेश्वरी तत्त्वाचा साक्षात्कार होतो. तर्क आणि बुद्धी यांच्या पलिकडचे आत्मतत्त्व प्रमाणांनी सिद्ध होणारे नाही. हे समजून येण्यासाठी गुरुकृपा आणि अनुभूती हीच उपकारक ठरते हे महाराजांनी जागोजाग स्पष्ट केले आहे.

वेदांत आणि भक्ती यांचा समन्वय साधत महाराज म्हणतात -

**काय ब्रह्मज्ञान बोलोनि कोरडे । हरिप्रेम रडे जंव नाही ।।१।।**
**वेदान्त पढोनि, निवास विषयी । यमदंड कांही चुकेना त्या ।।२।।**
**जंव नाही वृत्ति झाली कृष्णमय । तंव भवभय पाठी आहे ।।३।।**
**ज्ञानेश्वरकन्या श्रीकृष्णाश्रयाने । कान्तस्कंधयाने नित्य लाहे ।।४।।**[१५०]

जे लोक पढतमूर्ख असतात ते नुसते ग्रंथवाचन करतात आणि सिद्धांताचे कोरडे प्रतिपादन करतात. ही घटपटादी खटपट निरर्थकच असते. परमेश्वराच्या प्रेमाने डोळ्यात अश्रू येत नाहीत वा अंगावर रोमांच उभे राहत





नाहीत तोवर कोरडे ब्रह्मज्ञान घेऊन काय करणार. अशा वितंडवादी पंडितांना यमदंडाचे शासन काही पाठ सोडत नाही. चित्तवृत्ती कृष्णमय होऊन चराचराचे ठायी चैतन्यकृष्णाची अनुभूती येणे हाच खरा मार्ग होय.

अशी अवस्था अद्वैत भक्तिनेच प्राप्त होऊ शकते हे स्पष्ट करीत महाराज म्हणतात -

**डोळ्यांच्या आधारे दृश्याचे स्वरूप । होय आपेआप द्रष्टा जैसा ।।१।।**
**तैसी ब्रह्माधारे धरिताचि प्रीति । सगुणप्रतीति कृष्णी होय ।।२।।**
**अद्वैती जे भक्ति तिचे हे लक्षण । केले निरूपण श्रीगुरूंनी ।।३।।**[१५१]

दृष्टा आणि दृष्य म्हणजेच पुरुष आणि प्रकृती या संज्ञा परस्परसापेक्ष आहेत. परब्रह्मावर प्रेम जडले म्हणजे त्याची सगुण प्रचिती श्रीकृष्णरूपात येते आणि त्यातूनच अद्वैत भक्ती प्रकट होते. जीव, जगत् आणि परमेश्वर यात एकत्व पाहणे, उपासक आणि उपास्य यात अभेद पाहणे हीच अद्वैत भक्ती होय. या अद्वैत भक्तिचा उदय सद्‌गुरुकृपेने होतो हे स्पष्ट करीत महाराजांनी वेदांतातील ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग यांचा सुरेख समन्वय साधला आहे.

भक्तिमार्गामध्ये नामसाधन हे अत्यंत महत्त्वाचे समजले जाते. नामाचा नेम हीच साधना होय. हे सर्व काही चराचर विश्व नाममय होते तेव्हाच सर्वाभूती परमेश्वर असल्याचा अनुभव येतो. हाच मुद्दा स्पष्ट करीत प्रज्ञाचक्षू म्हणतात-

**नामासाठी नीलकंठ । बैसे स्मशानी उद्‌भट ।।१।।**
**नामासाठी ऋषि मुनि । निघूनिया गेले वनी ।।२।।**
**नाम गर्जताति वेद । लक्षित लक्षणा भेद ।।३।।**
**नाम गर्जताति पुराणे । एक्या हरिगुणगाने ।।४।।**
**नाम सर्वांचेही सार । ऐसे बदले ज्ञानेश्वर ।।५।।**[१५२]

नामाची अनुभूती येण्यासाठीच भगवान् शंकर स्मशानात बसतात. नामाची अनुभूती येण्यासाठी ऋषीमुनी अरण्यात निघून जातात. लक्षित लक्षणाभेदाने वेदही नामाचेच महात्म्य गात असतात. सर्व पुराणांमध्ये हरिसंकीर्तनाचाच उपदेश करण्यात आला आहे. नाम हे सर्वांचे सार आहे. ज्ञानेश्वर माऊलींनेही नामाचाच उपदेश केला आहे असे महाराज म्हणतात.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या अभंगांतून वेदांताचे अद्वैत ज्ञान आणि भक्तितील उत्कटता यांचा समन्वय साधण्यात आला आहे. जे जे प्रेमावीण असते ते ते व्यर्थ होय. हाच संदेश महाराजांनी दिला आहे. अर्थातच त्यांचा बुद्धिवादी ज्ञानाला विरोध नाही. परंतु तर्कबुद्धिच्या ज्ञानाला प्रेमाची जोड असावी हेच प्रतिपादन त्यांनी केले आहे.

**समन्वयाची व्यापक दृष्टी :**

प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज हे 'समन्वयाचार्य' म्हणून ओळखले जातात. विविध दर्शने आणि साधनांचे मार्ग यात समन्वय साधण्याचा प्रयत्न प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी केला आहे. किंबहुना वैदिक परंपरेची भूमिका हीच समन्वयाची आहे. महाराजांनी खालील अभंगात वेगवेगळ्या व्याख्या स्पष्ट करीत आपली समन्वयाची दृष्टी स्पष्ट केली आहे.

**शास्त्र त्याचे नांव, जेथे समन्वय । येर आघवीये शब्दजाल ।।१।।**
**तर्क त्याचे नांव, ब्रह्मावीण आन । कदा नेणे मन आक्षेपूनि ।।२।।**
**वृत्ति त्याचे नांव, हारपले द्वैत । हृदयी खेळत चिदानंद ।।३।।**
**ज्ञान त्याचे नांव, आपुलिये पोटी । ब्रह्मांडाच्या कोटि सामाविल्या ।।४।।**
**मोक्ष त्याचे नांव शुभाशुभाभाव । रागद्वेष ठाव पुसोनिया ।।५।।**
**तृप्ति त्याचे नांव, वाणीमनकाया । जीवेभावे माया गुरूपायी ।।६।।**





**गुरु त्याचे नांव, जो का शिष्यासाठी । नित्य नवे कोटि शास्त्र रची ।।७।।**
**भक्ति तिचे नांव ज्ञानेश्वरावीण । तिन्ही काळी आन आवडेना ।।८।।**[१५३]

शास्त्र त्यालाच म्हणावे ज्यात समन्वय साधला जातो, बाकी सारे शब्दजंजाळ होय.

तर्क त्यालाच म्हणावे जो ब्रह्माशिवाय नसतो, बाकी सारे मनाची चंचलता होय.

वृत्ती त्यालाच म्हणावे जेथे द्वैत हरपते आणि हृदयी चैतन्याचा आनंद खेळू लागतो.

ज्ञान त्यालाच म्हणावे जे आत्मस्वरूपाचे ठायी विश्वाची अनुभूती घेते.

मोक्ष म्हणजेच ती अवस्था जेथे शुभ आणि अशुभ, राग आणि द्वेष या सर्व द्वंद्वांचा लय होतो.

तृप्ती त्यालाच म्हणावे जेथे काया, वाचा आणि मन हे जीवाभावाने सद्गुरुच्या चरणाशी लीन होतो.

गुरू त्यालाच म्हणावे जो शिष्यासाठी नव्या नव्या शास्त्रांची रचना करतो.

ज्या अवस्थेत ज्ञानेश्वरांशिवाय म्हणजेच सद्गुरुशिवाय अन्य कशाचीही ओढ शिल्लक राहत नाही तीच भक्ती होय.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपले तत्त्वज्ञान मांडताना समन्वयाची दृष्टी स्वीकारली आहे.

याप्रमाणे प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या अभंगांतून जागोजाग समन्वयाचे सूत्र प्रतिपादन केले आहे. समन्वय हाच वैदिक परंपरेचा मूलाधार आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे चार वेद अनुक्रमे ज्ञान, कर्म, भक्ती आणि तंत्र यांचे प्रतिनिधित्व करणारे असले तरी वैदिक यज्ञाची संपन्नता या चारही वेदांच्या समन्वयात म्हणजेच ज्ञान, कर्म, भक्ती आणि तंत्र यांच्या समन्वयात सामावलेली आहे. ज्ञानमार्ग, कर्ममार्ग आणि भक्तिमार्ग हे सकृतदर्शनी वेगवेगळे म्हटले असले तरी एकात एक गुंतलेले आहेत. ज्ञानाशिवाय कर्म नाही. कर्माशिवाय भक्तीला अर्थ नाही, भक्ती कर्माशिवाय सिद्ध होत नाही. भक्तीला ज्ञानाशिवाय अर्थ नाही. याप्रमाणे ज्ञान, कर्म, भक्ती यांचा समन्वय साधणे आवश्यक आहे. हा समन्वय म्हणजेच योग. परमेश्वराचा शोध हा या जगताला सोडून घ्यावयाचा नसतो तर जगताचे ठायी विश्वात्मबोधाने परमेश्वराचा साक्षात्कार झाला म्हणजेच उपनिषदांना अभिप्रेत असलेले महावाक्यातून होणारे परमार्थ ज्ञान होऊन ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान या त्रिपुटीचा लय होतो. ही अवस्था प्राप्त होण्याचा मार्ग बुद्धी आणि तर्कांचा नसून सद्गुरुकृपेचा आहे, हेच महाराजांच्या तत्त्वज्ञानपर अभंगांचे सार होय.

१. प्रज्ञाचक्षूंचे तत्त्वज्ञान हे भक्तिमार्गी असले तरी वेदांचा आधार मान्य करणारे आहे. वेद हेच सर्व ज्ञानाचे मूळ आहे जे वैदिक आहे ते स्वीकारावे, जे अवैदिक आहे ते नाकारावे अशी महाराजांची भूमिका दिसून येते.

२. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांचे मधुराद्वैताचे तत्त्वज्ञान भक्तिमार्गी असले तरी ते पूज्यपाद शंकराचार्यांच्या अद्वैत वेदांताला अनुसरणारे आहे. ज्ञानोत्तर भक्तिचा आवर्जून आग्रह महाराजांनी घेतला आहे. महाराजांनी दिलेले दृष्टांतही आचार्यांच्या दृष्टांताला समांतर असेच आहेत.

३. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी आपल्या तत्त्वज्ञानाच्या मांडणीत, सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्व आणि उत्तर मीमांसा अशा सहा दर्शनांचा सखोल विचार केला आहे. आणि समन्वपूर्वक अद्वैत वेदांताचे प्रतिपादन केले आहे.

४. श्रुती, स्मृती आणि सूत्र यांच्या आधारे महाराजांनी आपले तत्त्वज्ञान मांडले असून या सर्वांचा भावार्थ आपल्या प्रतिपादनातून येईल याची हेतुपूर्वक काळजी त्यांनी घेतलेली आहे असे दिसून येते.

५. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराजांनी श्रुतिवचनांचा मागोवा घेऊन विविध श्रुतिवचनांचे संदर्भ आपल्या अभंगात कुशलतेने मांडत श्रुती, स्मृती, पुराणांच्या आधारे आपले दर्शन मांडले आहे.

६. गीतेच्या वचनांचा सोपा अनुवाद करीत गीतेचे सार मांडत निष्काम कर्मयोगाचा लोकसंग्रहासाठी उपयोग करण्याचा विचार महाराजांनी मांडला आहे.

७. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या वेदांतपर अभंगात अद्वैत बोध होऊन तत्त्वसिद्धी होण्यासाठी गुरुकृपेचे सहाय्य घेत अभ्यासाचा मार्ग चोखाळण्याचा उपदेश केला आहे. तथापि हे करीत असताना आपला स्वधर्म म्हणजे वर्णाश्रमानुसार प्राप्त झालेले कर्तव्य माणसाने केले पाहिजे. कर्तव्य पूर्ण करीत परमेश्वराचे अनुसंधान ठेवणे हीच खरी सोहं साधना होय. हाच तत्त्वज्ञानाचा मार्ग आहे असे महाराजांचे प्रतिपादन आहे.

८. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपल्या अभंगांतून वेदांताचा अन्वयार्थ स्पष्ट करीत आपले तत्त्वज्ञान मांडले आहे. हे करीत असताना त्यांनी पूज्यपाद आद्यशंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेतला आहे. तसेच सद्‌गुरु ज्ञानेश्वर माऊलींनाही त्यांनी अनुसरले आहे. पूज्यपाद शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर माऊली यांच्या तत्त्वज्ञानाचा पवित्र संगम म्हणजेच प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांचे तत्त्वज्ञान होय.

९. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या अभंगांतून विश्वात्मभाव व्यक्त होतो. परमेश्वर हा जसा सगुणरूपात साकारलेला आहे तसाच तो निर्गुणरूपातही आहे. त्याचे ज्ञान तर्कानें होणे शक्य नाही. केवळ गुरूकृपेनेच हे ज्ञान होऊ शकते.

१०. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांच्या अभंगांतून वेदांताचे अद्वैत ज्ञान आणि भक्तीतील उत्कटता यांचा समन्वय साधण्यात आला आहे. जे जे प्रेमावीण असते ते ते व्यर्थ होय. हाच संदेश महाराजांनी दिला आहे. अर्थातच त्यांचा बुद्धिवादी ज्ञानाला विरोध नाही. परंतु तर्कबुद्धिच्या ज्ञानाला प्रेमाची जोड असावी हेच प्रतिपादन त्यांनी केले आहे.

११. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांनी आपले तत्त्वज्ञान मांडताना समन्वयाची दृष्टी स्वीकारली आहे.

* * * * * *



**संदर्भ :**


१. प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज, (संपादक) श्रीकृष्ण सखाराम केंकरे, अभंगांची गाथा, श्री. ज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ, दहिसाथ अमरावती, २००३, अभंग क्र. ८, पृ. २.

२. तत्रैव, अभंग क्र.१०, पृ. ३

३. तत्रैव, अभंग क्र.१३, पृ. ४.

४. तत्रैव, अभंग क्र.१६, पृ. ४.

५. तत्रैव, अभंग क्र.२०, पृ. ५.

६. तत्रैव, अभंग क्र.२६, पृ. ६.

७. तत्रैव, अभंग क्र.३२, पृ. ७.

८. तत्रैव, अभंग क्र.११, पृ. ३.

९. तत्रैव, अभंग क्र.३७, पृ. ८.

१०. तत्रैव, अभंग क्र.४९, पृ. ११.

११. तत्रैव, अभंग क्र.५२, पृ. १२.

१२. तत्रैव, अभंग क्र.५३, पृ. १२.

१३. तत्रैव, अभंग क्र.६०, पृ. १३.

१४. तत्रैव, अभंग क्र.६१, पृ. १३.

१५. तत्रैव, अभंग क्र.६६, पृ. १४.

१६. तत्रैव, अभंग क्र.७३, पृ. १५.

१७. तत्रैव, अभंग क्र.८२, पृ. १७.

१८. तत्रैव, अभंग क्र. ८३, पृ. १७.

१९. तत्रैव, अभंग क्र. ८६, पृ. १७-१८.

२०. तत्रैव, अभंग क्र. ८७, पृ. १८.

२१. तत्रैव, अभंग क्र. ९१, पृ. १९.

२२. तत्रैव, अभंग क्र. ९७, पृ. २०.
२३. तत्रैव, अभंग क्र. १०४, पृ. २१.
२४. तत्रैव, अभंग क्र. १०८, पृ. २२.
२५. तत्रैव, अभंग क्र. १३८, पृ. २८.
२६. तत्रैव, अभंग क्र. १४४, पृ. २९-३०.
२७. तत्रैव, अभंग क्र. १४८, पृ. ३०.
२८. तत्रैव, अभंग क्र. १५९, पृ. ३२.
२९. तत्रैव, अभंग क्र. १६१, पृ. ३३.
३०. तत्रैव, अभंग क्र. १८५, पृ. ३७.
३१. तत्रैव, अभंग क्र. २००, पृ. ४०
३२. तत्रैव, अभंग क्र. २०१, पृ. ४१
३३. तत्रैव, अभंग क्र. २१०, पृ. ४३
३४. तत्रैव, अभंग क्र. २५८, पृ. ५२
३५. तत्रैव, अभंग क्र. २६१, पृ. ५३
३६. तत्रैव, अभंग क्र.३०६, पृ. ६२.
३७. तत्रैव, अभंग क्र. ३०७, पृ. ६२
३८. तत्रैव, अभंग क्र. ३२६, पृ. ६६
३९. तत्रैव, अभंग क्र. ३५०, पृ. ७१
४०. तत्रैव, अभंग क्र. ४११, पृ. ८२
४१. तत्रैव, अभंग क्र. ६५०, पृ. १२९
४२. तत्रैव, अभंग क्र. ७६४, पृ. १५१
४३. तत्रैव, अभंग क्र. ७९७, पृ. १५९
४४. तत्रैव, अभंग क्र. ८०७, पृ. १६१
४५. तत्रैव, अभंग क्र. ८९८, पृ. १७८





४६. तत्रैव, अभंग क्र. ९१९, पृ. १८२
४७. पंडित वा. ना., शांकर तत्वज्ञानात भक्तीचे स्थान, नागपूर विद्यापीठ मुद्रणालय, नागपूर, (२००५), पृ. ३०२
४८. प्रज्ञाचक्षू श्री. गुलाबराव महाराज, (संपादक) श्रीकृष्ण सखाराम केंकरे, अभंगांची गाथा, श्री. ज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ, दहिसाथ अमरावती, २००३, अभंग क्र. ९८६, पृ. १९८
४९. तत्रैव, अभंग क्र. १०४२, पृ. २०९
५०. तत्रैव, अभंग क्र. १०५०, पृ. २११
५१. तत्रैव, अभंग क्र. १०५६, पृ. २१२
५२. तत्रैव, अभंग क्र. १०६६, पृ. २१५
५३. तत्रैव, अभंग क्र. ११२९, पृ. २२८
५४. तत्रैव, अभंग क्र. ११६८, पृ. २३६
५५. तत्रैव, अभंग क्र. १२३४, पृ. २४८
५६. तत्रैव, अभंग क्र. १३७४, पृ. २७७
५७. तत्रैव, अभंग क्र. १३८८, पृ. २८०
५८. तत्रैव, अभंग क्र. १४०८, पृ. २८७
५९. तत्रैव, अभंग क्र. १४०९, पृ. २८७
६०. तत्रैव, अभंग क्र. १४२५, पृ. २९०
६१. तत्रैव, अभंग क्र. १४५२, पृ. २९९
६२. तत्रैव, अभंग क्र. १४७०, पृ. ३०३
६३. तत्रैव, अभंग क्र. १४८०, पृ. ३०५
६४. तत्रैव, अभंग क्र. १४८३, पृ. ३०६
६५. तत्रैव, अभंग क्र. १४८९, पृ. ३०७
६६. तत्रैव, अभंग क्र. १५०२, पृ. ३१०

६७. तत्रैव, अभंग क्र. १५१२, पृ. ३१३

६८. तत्रैव, अभंग क्र. १५४६, पृ. ३२१

६९. तत्रैव, अभंग क्र. १५८८, पृ. ३३०

७०. तत्रैव, अभंग क्र. १६११, पृ. ३३६

७१. तत्रैव, अभंग क्र. १६१४, पृ. ३३७

७२. तत्रैव, अभंग क्र. १६५९, पृ. ३४८

७३. तत्रैव, अभंग क्र. २०१४, पृ. ४२८

७४. तत्रैव, अभंग क्र. २०२२, पृ. ४३०

७५. तत्रैव, अभंग क्र. २०२६, पृ. ४३१

७६. तत्रैव, अभंग क्र. २०३७, पृ. ४३३

७७. तत्रैव, अभंग क्र. २०३९, पृ. ४३४

७८. तत्रैव, अभंग क्र. २०५९, पृ. ४३९

७९. तत्रैव, अभंग क्र. २१००, पृ. ४४८

८०. तत्रैव, अभंग क्र. २११६, पृ. ४५५

८१. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगांची गाथा, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, (२००३), अभंग अ.क्र. ७६४ - १ ते ६, पृ. १५१.

८२. कोलंगडे रा. गो., ऋग्वेद दर्शन, योगीश्वर प्रकाशन, पुणे, (१९५४) पृ. २८५-२८७.

८३. स्वामी भक्तीवेदांत प्रभूपाद, गीता जशी आहे तशी, भक्तीवेदांत ट्रस्ट प्रकाशन, मुंबई, (२००४) पृ. १८७. गीता ४.२८

८४. गाडगीळ स. रा., वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्र आणि ज्ञानेश्वरकालीन भक्तीयोग, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, (१९७५) पृ. ११८.

८५. स्वामी भक्तीवेदांत प्रभूपाद, गीता जशी आहे तशी, भक्तीवेदांत



ट्रस्ट प्रकाशन, मुंबई, (२००४), अध्याय ३, श्लोक ३.

८६. हरिकृष्णदास गोयंदका, छांदोग्य उपनिषद, शांकरभाष्यासह (हिंदी अनुवाद), गीता प्रेस, गोरखपूर, (२००५), पृ.६५.

८७. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगांची गाथा, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, अभंग क्र. ७६८, पृ. १५२.

८८. गाडगीळ स. रा., वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्र आणि ज्ञानेश्वरकालीन भक्तीयोग, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, (१९७५), पृ. ११८.

८९. महर्षि वेद व्यास, श्रीमद्‌भागवत महापुराण, संपा. हरिकृष्णदास गोयंदका, गीता प्रेस, गोरखपूर, खंड - १, (१९८९), पृ. १८४ भा. २.९.१/२

९०. तत्रैव, खंड - २, (१९८९), पृ. ९२० भा. १२.३.५२

९१. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगांची गाथा, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, (२००३), अभंग क्र. ७७२, पृ. १५३.

९२. महर्षि वेद व्यास, श्रीमद्‌भागवत महापुराण, खंड - २, (१९८९), पृ. ३३० भा. १०.२९.

९३. गाडगीळ स. रा., वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्र आणि ज्ञानेश्वरकालीन भक्तीयोग, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, (१९७५), पृ. १३२.

९४. आद्य शंकराचार्य, ब्रह्मसूत्रभाष्य, २.२.४५, श्रीकृष्ण देशमुख संपादित ब्रह्मसूत्र भाष्य, प्रसाद प्रकाशन, पुणे, (२००४).

९५. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगांची गाथा, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती,(२००३), अभंग क्र. ६३८, पृ. १२७.

९६. स्वामी भक्तीवेदांत प्रभूपाद, गीता जशी आहे तशी, भक्तीवेदांत ट्रस्ट प्रकाशन, मुंबई, (२००४), गीता अध्याय १०, श्लोक ९-१०, पृ. ३७५.

९७. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, उपासना आणि भक्ती, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, (१९८९), पृ. १३६.

९८. महर्षि वेद व्यास, श्रीमद्भागवत महापुराण, संपा. हरिकृष्णदास गोयंदका, गीता प्रेस, गोरखपूर, खंड - २, (१९८९), पृ. २४८

९९. तत्रैव, पृ. ३२०

१००. स्वामी भक्तीवेदांत प्रभूपाद, गीता जशी आहे तशी, भक्तीवेदांत ट्रस्ट प्रकाशन, मुंबई, (२००४), गीता अध्याय ९, श्लोक २७, पृ. ३५३.

१०१. तत्रैव, गीता अध्याय १८, श्लोक ६५-६६, पृ. ५९८-९९.

१०२. तत्रैव, गीता अध्याय १८, श्लोक ४६, पृ. ५८४.

१०३. संतकवी दासगणू महाराज, दासगणू महाराज समग्र वाङ्मय, खंड-९, दासगणू आश्रम गोरठा, नांदेड, (१९७७), पृ. २९७.

१०४. तत्रैव, पृ. ४५६.

१०५. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, उपासना आणि भक्ती, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, (१९८९), पृ. १४८.

१०६. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगांची गाथा, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, अभंग क्र. १८७, पृ. ३८.

१०७. घटाटे कृ. मा., मधुराद्वैताचार्य श्री गुलाबराव महाराज यांचे भक्तिशास्त्र, श्री गुलाबराव महाराज भक्तिधाम, चांदूर बाजार, (२००१), पृ. ६.



१०८. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री गुलाबराव महाराजांच्या अभंगांची गाथा, संपा. श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती , (२००३), अभंग क्र. २७०, पृ. ५५.

१०९. महर्षि वेद व्यास, श्रीमद्भागवत महापुराण, संपा. हरिकृष्णदास गोयंदका, गीता प्रेस, गोरखपूर, खंड - १, (१९८९), पृ. ७९९, श्लोक ७.५.२३.

११०. तत्रैव, खंड - १, (१९८९), पृ. ४१, अध्याय ६, श्लोक ७६.

१११. तत्रैव, खंड - १, (१९८९), पृ. ७३१, श्लोक ६.१३.८

११२. तत्रैव, खंड - २, पृ. ९७०, श्लोक १२.१२.४७.

११३. स्वामी भक्तिवेदांत प्रभूपाद, गीता जशी आहे तशी, भक्तीवेदांत ट्रस्ट प्रकाशन, मुंबई, (२००४), अध्याय १८, श्लोक ५८-५८, पृ. ५९४.

११४. महर्षि वेद व्यास, (१९८९), श्रीमद्भागवत महापुराण, संपा. हरिकृष्णदास गोयंदका, गीता प्रेस, गोरखपूर, खंड - २, (१९८९), पृ. ६२०, श्लोक १०.८१.१९.

११५. तत्रैव, पृ. ७३६, श्लोक ११.५.३३.

११६. तत्रैव, पृ. ९७०, श्लोक १२.१२.४६.

११७. तत्रैव, पृ. २२०, श्लोक १०.१४.३२.

११८. महर्षि वेद व्यास, श्रीविष्णुसहस्रनाम, संपा. हरिकृष्णदास गोयंदका, गीता प्रेस, गोरखपूर, (२०००), पृ. १३०.

११९. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, भगवद्भक्तिसौरभ, श्रीकृष्ण केंकरे, श्री ज्ञानेश्वर मंदिर दहिसाथ, अमरावती, (१९८२), पृ. ५६.

१२०. प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज, अभंगांची गाथा, यष्टी ९, पूर्वार्ध, संपादक श्रीकृष्ण सखाराम केंकरे, श्री ज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ, दहिसाथ अमरावती, २००३, क्र. १२८६ पृ. २५८.

१२१. तत्रैव, अभंग क्र. ९५६, पृ. १९०.

१२२. तत्रैव, अभंग क्र. ९७२, पृ. १९४.

१२३. तत्रैव, अभंग क्र. ९७५, पृ. १९५.

१२४. तत्रैव, अभंग क्र. १०२१, पृ. २०५

१२५. तत्रैव, अभंग क्र. १०३३, पृ. २०७.

१२६. तत्रैव, अभंग क्र. ९६६, पृ. १९२.

१२७. तत्रैव, अभंग क्र. ९५८ पृ. १९०.

१२८. तत्रैव, अभंग क्र. ९८१ पृ. १९६.

१२९. तत्रैव, अभंग क्र. ११६२ पृ. २३४.

१३०. तत्रैव, अभंग क्र. ९८४, पृ. १९७.

१३१. तत्रैव, अभंग क्र. १२४८ पृ. २५०.

१३२. तत्रैव, अभंग क्र. ९६८, पृ. १९३.

१३३. तत्रैव, अभंग क्र. १३४१, पृ. २६८.

१३४. तत्रैव, अभंग क्र. ९२८, पृ. १८४.

१३५. तत्रैव, अभंग क्र. १००९ पृ. २०२

१३६. तत्रैव, अभंग क्र. ११४१ पृ. २३०

१३७. तत्रैव, अभंग क्र. ९३६ पृ. १८५

१३८. तत्रैव, अभंग क्र. ९६३, पृ. १९२.

१३९. तत्रैव, अभंग क्र. ९२९, पृ. १८४.

१४०. तत्रैव, अभंग क्र. ९७८, पृ. १९६.

१४१. तत्रैव, अभंग क्र. ९४०, पृ. १८६.





१४२. तत्रैव, अभंग क्र. १००५, पृ. २०२.

१४३. तत्रैव, अभंग क्र. १३२४, पृ. २६५.

१४४. तत्रैव, अभंग क्र. ९५०, पृ. १८९.

१४५. तत्रैव, अभंग क्र. ९९०, पृ. १९९.

१४६. तत्रैव, अभंग क्र. ९४४, पृ. १८७.

१४७. तत्रैव, अभंग क्र. १०३०, पृ. २०७.

१४८. तत्रैव, अभंग क्र. १०३६, पृ. २०८.

१४९. तत्रैव, अभंग क्र. ९३०, पृ. १८४.

१५०. तत्रैव, अभंग क्र. ११२६, पृ. २२८.

१५१. तत्रैव, अभंग क्र. ९३२, पृ. १८५.

१५२. तत्रैव, अभंग क्र. ९५५, पृ. १९०.

१५३. तत्रैव, अभंग क्र. १२४६, पृ. २५०.

* * * * * *